गोमन्त प्रकाशन

# मधली भिंत

( कथासंग्रह )




लेखक,

जनार्दन जगन्नाथ शिंक्रे.





जू[illegible] १९४३.




संग्रहाला जिचे नांव दिलेलें आहे ती 'मधली भिंत' ही दीर्घकथा एमिल झोला यांच्या A conquista duma mulher या कथेच्या आधारें लिहिलेली आहे. इतर चार कथांपैकीं 'दीपगृह' आणि 'वंचना' या दोन ज्यूलियु दान्तश् या पोर्तुगीज लेखकाच्या कथांवरून अनुवादित केलेल्या असून 'चुकलेले वाटसरू' आणि 'फसवणूक' या स्वतंत्र आहेत.

# अनुक्रम

# मधली भिंत

## — १ —

चाळीच्या अगदीं शेवटल्या मजल्यावर अरुणनें खोली घेतली होती. विधिमंडळाचे विख्यात सभासद सर निंबाळकर हेच त्या चाळीचे मालक. कांहीं मोडकळीस आलेलीं घरें पाडून सातआठ वर्षांमागें त्यांनीं ती चार मजली चाळ बांधली होती. सर निंबाळकरांचा भव्य वाडाहि लगतच होता.

खिडकीच्या कठड्याला टेंकून अरुण वाड्यापुढल्या बागेकडे विमनस्कपणें पहात होता. उंचउंच झाडांची सावली वायुलहरींबरोबर बागेंतल्या हिरवळीवर खेळत होती. चहूंबाजूंनीं निशिगंधाचा सुवास दरवळत होता. गुलाबाच्या ताटव्यांमधून घिरट्या घालणारीं फुलपांखरें मन वेधून घेत होतीं. दृष्टि जरा दूर फेकतांच तिथून केवढातरी भव्य देखावा दिसे. क्षितिजाला भिडलेला अफाट सागर, एकाद्या सळईप्रमाणें त्यांत शिरलेलें वाळकेश्वराचें भूशिर, छपरांच्या समुद्रामधून मध्येंच डोकावणारें सोनापूर, भव्य मनोरे! तें विशाल दृश्य पाहून क्षणभर कुणालाही आपल्या सुखदुःखांचा विसर पडावा!

अरुणनें सहज मागें वळून पाहिलें. खोलींतल्या प्रत्येक वस्तूवर त्याची नजर फिरत होती. ती खोली किती लहान, कोंदट! एका लहानशा खिडकींतून कितीशी हवा खेळणार आंत? खोलींतल्या मंद उजेडाप्रमाणें तिथलें सामानही गरिबीची जाणीव करून देणारें. एक छोटेंसें टेबल, खिडकीशेजारीं ठेवलेली खुर्ची आणि जमिनीवर अस्ताव्यस्तपणें पसरलेलें अंथरूण. पदरची पुंजी

संपुष्टांत येत चालली, तरी हेही दिवस जाऊन आपलें जीवन सुखाचें होईल या आशेनें काळ कंठणाऱ्यांपैकींच तो एक होता. रंग गेलेल्या भिंती, धुरकटलेलें छप्पर, कोंदट हवा, टीचभर जागा आणि तिथें नांदणारें दैन्य यांची त्याला फारशी फिकीर नव्हती. कडक थंडीचे दिवस, पण तिचे निवारण करायला आवश्यक ते कपडेसुद्धां त्याच्यापाशीं नव्हते. गार वारा अंगाला झोंबूं लागला म्हणजे मात्र जगांतल्या विषमतेबद्दलचे विचार त्याच्या मनांत घोळत. आपण इथें तळमळत पडलों आहोंत, पण श्रीमंतीच्या उबदार पांघरुणाखालीं सुखांत पहुडलेल्या धनिकांना आपल्या या दैन्याची कल्पना तरी असेल का ?

अंथरुणावर पडल्यापडल्या तो पलीकडच्या वैभवसंपन्न इमारती पहात राही. जणूं दुसऱ्या दिवशीं सूर्योदयाबरोबर समोर पसरलेलें शहर जिंकण्याचा निश्चय करून शहराबाहेरच्या एकाद्या गरीब झोपड्यांत निवांतपणें झोप घेणारा शूर सेनापतिच !

अरुणच्या जीवनाची कहाणी रहस्यमय थोडीच असायला ! रत्नागिरी-कडल्या एका कारकुनाचा तो एकुलता एक मुलगा. गांवच्या शाळेत श्रीगणेशा गिरविण्यापासून तों मॅट्रिकची परीक्षा बऱ्याच वरच्या नंबरास पास होईपर्यंत त्यानें नेहमीं आपल्या शिक्षकवर्गाकडून शाबासकी मिळविलेली. त्याची आई अगदीं अशिक्षित, पण आपल्या मुलानें मोठेपणा मिळवावा, नांवारूपास चढावें, जहागिरदारांच्या मुलाप्रमाणें बॅरिस्टर व्हावें, वैभव त्याच्या पायाशीं लोळत असावें, अशीं कितीतरी सुखस्वप्नें तिनें मनाशीं रंगविलीं होतीं. किती ममता होती तिची त्याच्यावर — घरच्या सांपत्तिक स्थितीची कल्पना आल्यावर निराश झालेल्या अरुणच्या मनाला किती धीरानें प्रोत्साहन देई ती ! अरुणच्या शिक्षणांत कांहीं उणें राहूं नये म्हणून तीं आईबापें जास्त काबाडकष्ट करीत, स्वतःच्या अडचणी-सुद्धां डोळ्यांआड करीत. त्या बिचाऱ्यांचें सुखसर्वस्व अरुणांत केंद्रित झालें होतें.

पण एकाएकीं एक दिवस अरुणची आई वारली. तिच्या आशाअपेक्षा अतृप्तच राहिल्या. अखेरच्या घटका मोजतांना अरुणकडे भरल्या डोळ्यांनीं पहात ती ओढलेल्या आवाजांत म्हणाली,

—बाळ, मी अगदीं दुर्दैवी आहें. तुझं सुख मला आतां पहायला मिळणार नाहीं. पण तूं कुणीतरी मोठा माणूस होशील असा मला भरंवसा आहे. तोंपर्यंत माझा अतृप्त जीव तुझ्याभोंवतीं घोटाळत राहील.

तेच तिचे शेवटचे शब्द. अरुणच्या हृदयाच्या गाभाऱ्यांत जाऊन बसले ते. सभोंवार पसरलेली निवांत शांतता, झुळुकीबरोबर समईतली ज्योत कंपित होऊं लागली म्हणजे समोरच्या भिंतीवर हलत असलेली त्याच्या आईच्या मृतदेहाची छाया, सजल नेत्रांनीं आपल्या आयुष्यांतल्या सोबतिणीकडे पहात राहिलेले त्याचे वडील, आणि सुन्नपणें सभोंवार फिरणारी त्याची स्वतःची नजर! तो शोककारक प्रसंग कधींतरी विसरणें शक्य होतें का त्याला? आईचा मृत्यु म्हणजे त्याच्या हृदयांत रुजलेल्या महत्त्वाकांक्षांना अप्रत्यक्षपणे बसलेला धक्काच होता.

उच्च शिक्षण घेण्याची त्याची केवढीतरी इच्छा होती. पण पोटाचा प्रश्न सोडविण्याची जबाबदारी आतां सर्वस्वी त्याच्यावर पडली होती. आणि तिच्या जोडीलाच जिन्यावरून घसरून खालीं पडल्यामुळें निकामी झालेल्या वडिलांची शुश्रूषा करण्याची जबाबदारी होती ती वेगळीच. एका व्यापाऱ्याकडे लहानशी नोकरी पत्करतांना त्याला कितीतरी वाईट वाटलें. त्या दिवशीं त्यानें एकांतांत किती अश्रु ढाळले! त्याचें हृदय पिळवटून निघत होतें. सेवेचें तें यांत्रिक जीवन त्याला नीरस, असह्य वाटे.

सातआठ वर्षेपर्यंत निरुपायानें तो तिथें काम करीत होता. क्षणोक्षणीं त्याचें बंडखोर मन उसळी घेई. कुठेंतरी दूर जाऊन नशीब काढूं, असें तो आपल्याशीं म्हणे. पण अपंग स्थितींतले त्याचे वडील—त्यांच्याकडे नजर देऊन त्याला आपल्या मनाचा कोंडमारा सहन करावा लागे.

पण एके रात्रीं कामावरून येतांच त्याला आपले वडील जमिनीवर अस्ताव्यस्त पडलेले आढळले. जवळच अर्धवट पेटलेली लठ्ठशी विडी पडली होती. अजूनही छातींत थोडी धुगधुगी होती. अरुणनें प्रयत्नांची पराकाष्ठा केली.

पण त्यांना यश आलें नाहीं. ज्या मायेच्या पाशांनीं तो आजवर त्या लहानग्या गांवांत अडकून पडला होता ते सारे तुटून जाऊन बाहेरच्या विशाल जगांत भराऱ्या मारण्यास तो मोकळा झाला होता.

क्रियाकर्म आटोपल्याबरोबर त्यानें होतें नव्हतें ते किडुकमिडूक विकून टाकलें. अगदीं मोडकळीस आलेलें आपलें लहानगें घर विकतांना त्याचें हृदय पिळवटून निघालें. आपली आई, आपले वडील व त्यांच्या सहवासांत घालविलेले क्षण — सर्वांच्या स्मृति अगदीं ताज्या होत्या. अरुण आपल्या साऱ्या जिनगीची विल्हेवाट लावतो आहे, हें पाहून त्याच्या ओळखीच्या माणसांना वाटूं लागलें कीं, शोकभरानें अरुणचें डोकें फिरलें आहे. प्रत्येकानें त्याला उपदेश करण्याचा प्रयत्न केला. पण त्या साऱ्यांचा निरोप घेऊन अरुणनें मोठ्या आशेनें मुंबईच्या दिशेनें पाऊल उचललें. अवघे शंभर सव्वाशें रुपये हेंच त्याचे भांडवल होतें.

अरुणची महत्वाकांक्षा दांडगी होती. आपल्या आईपासून तो गुण उचलला होता त्यानें. त्याची प्रबल इच्छाशक्ति, जबर आत्मविश्वास आणि सभोंवतालच्या परिस्थितीचें शांतपणें आकलन करावयास आवश्यक असलेलें गांभीर्य वगैरे गोष्टी म्हणजे त्याच्या आईनें आपल्या तपश्चर्येच्या जोरावर अरुणच्या संस्कारक्षम हृदयांत पेरलेल्या बीजांचीं फळें होतीं. नुकताच पंचविशींत प्रवेश केलेला. पण त्याच्या प्रत्येक हालचालींत किती स्वाभिमान प्रकट होई! आपण इतरांपेक्षां श्रेष्ठ आहोंत, कोणीतरी निराळे आहोंत, असें त्याला नेहमीं वाटे.

एखाद्या वेळीं तो मोठ्या खुशींत असला म्हणजे आपलीं ध्येयें, आपल्या आशाआकांक्षा वगैरे बाबतींत मन कुणापाशीं तरी खुलें करण्याची त्याला अनिवार इच्छा होई. संभाषणाच्या ओघांत उल्हसित मुद्रेनें तो आपल्या मित्रांना सांगे,

—मी कुणीतरी मोठा माणूस होईन ...

अगदीं आवडतें वाक्य होतें तें त्याचें. पण तेंच इतरांच्या टीकेचा, हंशाचा विषय होई. अन् यांत कांहीं जगावेगळें होतें अशांतला प्रकार थोडाच! महिन्याकांठीं मोठ्या मिनतवारीनें दहापांच रुपड्या मिळविणाऱ्या, आंखूड बाह्यांचे व घट्ट गळपट्टीचे जाडेभरडे कपडे वापरणाऱ्या एका गरीब तरुणाच्या तोंडचें तें वाक्य विनोदाचा विषय ठरणें साहजिकच होतें. पण अरुणच्या मनाची तयारीच मुळीं इतकी झाली होती कीं, त्याला त्याचें वैषम्य वाटत नसे. अजिंक्यपद हें बावळटांसाठीं नाहीं; तर निधड्या छातीच्या, धाडसी, शूर माणसांसाठीं आहे; प्रबल इच्छेआड कोणतीच शक्ति येऊं शकत नाहीं, तिला अशक्य असें कांहींच नाहीं, असाच त्याचा दृढ विश्वास होता.

सुट्टीचे दिवस असले म्हणजे तो गांवाबाहेरच्या हवाशीर माळावर फिरावयाला जाई. त्या विशुद्ध वातावरणांत त्याच्या हृदयांत असंख्य भावना उचंबळून येत. आपण बुद्धिमान् आहोंत, कर्तबगार आहोंत अन् आपल्या हृदयाच्या गाभाऱ्यांत दडून बसलेल्या सहजप्रवृत्ति आपणाला सांगत आहेत कीं, पहा, समोर किती विस्तृत क्षितिज पसरलेलें आहे. तें तुझ्या मनसोक्त भराऱ्यांना मोकळें आहे. जा, तुझ्या महत्वाकांक्षा सफल होतील.

किती उल्हसित वृत्तींत तो घरीं परते. जणूं साऱ्या सुखाशा सुफलित झालेल्या आहेत. वडिलांच्या शेजारीं बसून चार बरेवाईट घांस खातांना त्याच्या अंतश्चक्षूंपुढें कितीतरी मनोहर दृश्यें उभीं रहात! आपण थोरथोर माणसांच्या पंक्तीला बसलों आहोंत, वयाची विशी उलटेपर्यंत ज्या माणसांशीं आपला यत्किंचितहि संबंध आला नाहीं त्यांच्यांत आपण सन्मानानें वावरत आहोंत, प्रत्येकजण क्षणोक्षणीं आपला शब्द झेलण्यांत धन्यता मानीत आहे आणि आपण मात्र त्यांच्याकडे लक्ष दिलें न दिलेंसें करून मधल्या अंतराची त्यांना जाणीव करून देत आहोंत.

त्या कल्पनांच्या मुळाशीं द्वेषबुद्धि नव्हती किंवा ऐषआरामांत जीवन घालविण्याची इच्छाहि नव्हती. त्याच्या श्रेष्ठ बुद्धिमत्तेची आणि महत्त्वाकांक्षेची

ती नैसर्गिक भूक होती. आपणाकरतां जें वैभवसंपन्न जग निर्माण झालें आहे त्या जगांत पाऊल टाकण्याची ती सुप्त इच्छा होती.

घरादाराला रामराम ठोकून मुंबईच्या मायाबाजारांत पाय ठेवतांना त्याला वाटत होतें कीं आपण त्या विशाल क्षेत्रांत प्रवेश केला कीं आपणाला योग्य असें पद आपल्याकडे धांवतच येईल. किती गोड संवेदनांनीं त्याचें हृदय पुलकित झालें! चोहींकडे प्रकाश, आनंद, वैभव आणि सौंदर्य यांचेच रम्य नृत्य चाललें आहे, असें त्याला वाटलें.

अगदीं त्याच दिवसापासून तो आपल्या तयारीला लागला. येतांना आणलेल्या ओळखीच्या पत्रांची त्यानें योग्य व्यवस्था केली. आपले गांवकरी होते त्यांच्याकडे जाऊन मदतीची अपेक्षा केली. पण दिवसांमागून दिवस गेले, एक महिना गेला, तरी अगदीं पहिल्या दिवसाच्या परिस्थितींत किंचित्सुद्धां फरक पडला नाहीं. मिळेल ते काम करण्याची त्याची तयारी होती. पण अजूनही त्याची इच्छा पुरी होण्याचा रंग दिसेना.

— अगदीं वाईट वेळीं आलांत बुवा – असेंच प्रत्येकजण त्याला म्हणे. आश्वासनांची खैरात करायला मात्र कुणी सहसा विसरत नसे. तीं कृतींत कितपत उतरत ही गोष्ट वेगळी. दिवसेंदिवस त्याची पुंजी कमी होत चालली होती. एक दिवस त्यानें सहजच आपली शिल्लक मोजून पाहिली. अवघे वीस रुपये शिल्लक राहिलेले पहातांच त्याला क्षणभर धक्का बसला. त्याच्या मनाचा मोठा गोंधळ उडाला. या चिमुकल्या भांडवलावर आपण काय करणार, असा विचार येतांच क्षणभर त्याची मोठी चलबिचल झाली. पण त्याचा आशावाद दांडगा होता. मोठ्या निग्रहानें आपली गोंधळलेली मनोवृत्ति त्यानें काबूत आणली आणि दुसऱ्या दिवसापासून तो जास्त धडाडीनें आपल्या कामास लागला. त्या पुंजीवर त्यानें आणखी एक महिना कसा काढला हें त्याचें त्यालाच ठाऊक. रोज एकवेळ जेवायचें अन् उजाडल्यापासून रात्र होईपर्यंत सबंध मुंबई पालथी घालायची असा बिचाऱ्याचा क्रम चालला होता. दिवसभराच्या श्रमानें अगदीं

गलितगात्र होऊन तो खोलींत परतला म्हणजे त्याचे पाय आपोआप अंथरुणाकडे वळत. खोलींतल्या काळोखांत अव्यवस्थितपणें पसरलेला तो बिछाना हेंच त्याचें विसाव्याचें स्थान. अजूनहि त्याचें धैर्य खचलें नव्हतें. जगाविषयीं एक प्रकारचा तीव्र तिरस्कार मात्र त्याला हळूहळू वाटूं लागला होता. हात धुवून आपल्या पाठीमागें लागलेले दुर्दैव त्याला निर्दय वाटे.

त्या रात्रीं तो कांहीं न खातांच त्या आपल्या ढोलींत शिरला. आदल्या दिवशीं त्यानें एक पावाचा तुकडा आणि चणेकुरमुरे एवढ्यावर समाधान मानून घेतलें होतें. पदरीं एक दमडीसुद्धां राहिली नव्हती आणि आठ-बारा आणे मागून घेण्याजोगा एकादा मित्रहि त्या अफाट शहरांत नव्हता. सबंध दिवसभर एकसारख्या पावसाच्या सरीवर सरी येत होत्या. हवाहि अगदीं थंड पडली होती. रस्त्यावर चिखलाचें पाणी सांचलें होतें.

अरुण भिजत कांकडत दादरला गेला होता, अन् नंतर माजगांवपर्यंतहि त्यानें एक हेलपाटा घातला होता. तिकडे नोकरी मिळण्याचा संभव असल्याचें त्याला कुणींतरी सुचविलें होतें. पण दादरची जागा भरली होती. आणि टाइपरायटिंगचा चांगला सराव नसल्यावरून त्याला माजगांवची नोकरी मिळाली नाहीं. अगदीं शेवटचे असे हे आशेचे दोन धागेसुद्धां त्याच्या दुर्दैवानें तोडून टाकले होते. कसलीहि नोकरी पत्करण्याची आतां त्याची तयारी होती. त्याहि परिस्थितींतून, संधि सांपडतांच आपण आपला मार्ग काढूं, अशी त्याची खात्री होती. सध्या नुसती अन्नपाण्याची अन् निवाऱ्यासाठीं चार हात जागेची व्यवस्था झाली असती तरी त्यानें त्यांतदेखील समाधान मानलें असतें. एक एक दगड जमवून, अविश्रांतपणें खपून, आपल्या भाग्याचा मनोरा आपण उभवूं असें त्याचें मन त्याला ग्वाही देत होतें.

माजगांवला कटु अनुभव येतांच पोळलेल्या हृदयानें अन् अत्यंत उदासपणें एकेक पाऊल टाकून खोलीपर्यंतचा रस्ता आक्रमीत असतांना, आपल्या सुखाशांचे उत्तुंग मनोरे धडाधड ढासळून पडत आहेत, असाच त्याला क्षणभर भास झाला.

पावसाची सर नुकतीच बंद झाल्यामुळें फुटपाथवर वाढलेल्या गर्दींतून प्रत्येकजण धक्काबुक्की करीत पुढें जात होता.

नकळतच त्याचे पाय एका मारवाड्याच्या दुकानासमोर थांबले. हजारों रुपयांची देवघेव तेथें चालली होती. या जीवनकलहांत विजयी होण्याकरतां त्यांतले अवघे पांच रुपयेसुद्धां त्याला कदाचित् पुरेसे झाले असते. एकमेकांना लोटीत पुढें जाणाऱ्या त्या अफाट जनसमूहाला एक दिवस आपल्या इच्छेप्रमाणें वागवायला तेवढी थोडकी रक्कमसुद्धां कारणीभूत होऊं शकली असती. पांच रुपड्यांच्या जोरावर आठ दिवस सहज काढतां येतात अन् एका आठवड्यांत अकल्पितपणें कितीतरी प्रचंड घडामोडी होऊं शकतात. या विचारांत तो गढून गेला असतांना झर्रकन् एक मोटार निघून गेली अन् वेळींच बाजूला व्हायचें भान न राहिल्यामुळें त्याच्या अंगावर चिखलाचें पाणी उडालें.

दुखावलेल्या सर्पाप्रमाणें त्यानें क्षणभर त्या मोटरकडे पाहिलें. तोंडावरचें पाणी पुसून काढतांना त्यानें आजूबाजूला पाहिलें. कांहीं टारगट पोरें त्याच्याकडे बोट करून हंसत होतीं. त्याची वृत्ति अगदीं बेफाम झाली होती. त्या साऱ्या जनसंमर्दावर तुटून पडून आपल्या वज्रमुष्टीखालीं त्या साऱ्यांना चिरडून टाकावें आणि आपल्या दुर्दैवावर सूड उगवावा अशा तऱ्हेचे क्रूर विचार त्याच्या निराश मनांत उसळी घेऊं लागले. पण आपल्या असहायतेची त्याला जाणीव होती. दांतओठ खात मनचे उमाळे मनांत दडपीत मार्गक्रमण करणें इतकेंच त्याच्या हातांत होतें.

गिरगांवांत तो एक ट्रॅमखालीं चिरडून जायचा थोडक्यांत बचावला. रस्ता ओलांडून तो जरा फुटपाथवर थांबला. समोरच्या प्रचंड हवेल्या पाहून त्याच्या कपाळाला आंठ्याच पडल्या. एकादा जखमी रानडुकर पाठलाग करणाऱ्या शिकारी कुत्र्यांना झुकांडी देत वेगांत जातो त्याप्रमाणें अरुण सरळ चालला होता. जरा पुढें जातांच एक मुलगा आडवा आल्यामुळें त्याला जरा डावीकडे वळावें लागलें, त्यामुळें आपला अपमानच झाला असें त्याच्या दुखावलेल्या मनस्थितीला वाटलें.

पोरेंबाळेंसुद्धां आपला रस्ता अडवतात याबद्दलचा संताप त्याच्या धुंद नेत्रांत तरळत होता.

आणि एकदांचा तो शेवटच्या मजल्यावरच्या आपल्या खोलींत येऊन पोहोंचला. त्यानें धाडकन् जवळच्या खुर्चीवर आपलें अंग टाकून दिलें. जणू एखादा जखमी हिंस्र पशु आपल्या ढोलींत सुखानें प्राण सोडायला आला होता. अरुणचें अंग अगदीं गळून गेलें होतें. भुकेनें आणि श्रमांनीं प्राण कासावीस झाला होता. मळलेल्या इजारीवरच्या डागांकडे आणि चिखलानें माखलेल्या फाटक्या बुटांकडे त्याची नजर लागली होती.

श्रमांची पराकाष्ठा झाली होती. चैतन्य हिरावलें गेल्यासारखें झालें होतें. याच्यापुढें किंचितही त्रास सहन करण्याची त्याची मन:स्थिति नव्हती. या यातनांतून सुटका करून घेणें अत्यंत आवश्यक होतें. कोणत्या साधनानें आत्महत्या करावी याचाच विचार अरुण करीत होता. त्याच्या स्वाभिमानाची कमान अजूनही खालीं आली नव्हती. आपल्या आत्महत्येनें आपण साऱ्या मुंबईंत खळबळ उडवून देऊं, श्रीमंतीच्या धुंदींत मग्न असणाऱ्या माणसांवर सूड उगवूं, अशी त्याची कल्पना होती. आपण बलवान् आहोंत, कर्तृत्वशाली आहोंत, पण इतरांना आपलें श्रेष्ठत्व कळूं नये, आठवारा आण्यांचे पैसे याचनाही करून मिळण्यासारखी परिस्थिति नसावी.... किती भयंकर गोष्ट वाटत होती त्याला ती. अन् त्यामुळें त्याच्या मन:सृष्टींतलें वादळ क्षणोक्षणीं उग्र स्वरूप धारण करीत होतें. आपल्या मनगटांत केवढा जोर आहे, पण आज दोन महिने तीं कुचकामी, निरुपयोगी बनलीं, या कल्पनेनें त्याच्यावर अंमल चालवितांच त्याला अतोनात दु:ख झालें. कसल्याही कामाची त्याला पर्वा वाटत नव्हती. पण आज तो पिंजऱ्यांत अडकलेल्या सिंहाप्रमाणें निकामी होऊन कुठल्या तरी सांदीकोंपऱ्यांत येऊन पडला होता.!....

मानसिक अस्वस्थता कांहीं वेळानें दूर झाली. मृत्युच त्याला थोर वाटत होता. बालपणीं ऐकलेली एक गोष्ट त्याला आठवली. कुणा एका शास्त्रज्ञानें एक आश्चर्यकारक यंत्र महत्प्रयासानें तयार केलें होतें. पण जगाची बेपर्वाईची वृत्ति पाहून त्या प्रतिभावंताला संताप आला अन् त्यानें हातोड्यानें त्या अद्वितीय यंत्राचे तुकडे तुकडे केले.

अरुणला वाटलें, आपणसुद्धां त्या शास्त्रज्ञासारखेच. आपला देह हेंदेखील एक अद्‌भुत यंत्रच आहे. बुद्धिमत्तेच्या आणि महत्वाकांक्षेच्या प्रेरक शक्तीनें चालणारें हें यंत्र हवे ते चमत्कार घडवून आणण्यास समर्थ आहे. पण जगाला त्याची काय किंमत ? अन् म्हणून ते तो आपल्या खोलींतून फुटपाथवरच्या फरशीवर टाकून त्याच्या ठिकऱ्या ठिकऱ्या करणार होता.

मावळतीचे चोरटे किरण सर निंबाळकरांच्या बागेंतल्या उंच झाडांच्या शेंड्यांवर खेळत होते. पावसाच्या सरीनंतर डोकावणारें ऊन केव्हांही झालें तरी मनोहरच ! अरुणचे लक्ष तिकडे वेधलें गेलें. आत्महत्या करण्यापूर्वी नेत्रांना लागलेली प्रकाशाची तहान त्याला पुरी करून घ्यायची होती. खिडकींत येऊन तो जरा उभा राहिला. तिथूनच कित्येकदां त्यानें बागेंतल्या झाडांच्या हिरव्या पालवीमधून किंवा अधूनमधून डोकावणाऱ्या हिरवळीच्या पायवाटेनें जाणाऱ्या एका तरुणीला पाहिलें होतें. जरा काळीसांवळीच, आकर्षक बांध्याची, एखाद्या राजकन्येच्या डौलानें चालणारी होती ती.

अठरा विश्वे दारिद्र्याचें साम्राज्य पसरलेल्या आकुंचित खोलींत बसून मोठमोठीं सुखस्वप्नें पहायचीं, श्रीमंतांच्या पोरी आपल्यावर लुब्ध होऊन आपल्या प्रीतीसाठीं सर्वस्व अर्पण करताहेत, प्रीति आणि संपत्ति या दोन्हींच्या साहचर्यानें आपला भविष्यकाल उज्ज्वल होत आहे, अशीं मनोराज्यें रचणाऱ्यां-पैकीं अरुण नव्हता. पण तरीसुद्धां आत्महत्येच्या त्या गंभीर प्रसंगीं त्याला एकाएकीं त्या ऐटदार सुंदर तरुणीची आठवण झाली. नांव तरी काय असेल तिचे ?

पण त्याच क्षणीं त्यानें त्वेषानें मुठी आवळल्या. त्या वाड्यांतल्या रहि-वाशांविषयीं त्याच्या मनांत अकारण अढी बसून राहिली होती. अर्धवट उघडलेल्या खिडक्यांआडून दिसणारें ऐश्वर्य अन् त्याचा उपभोग घेणाऱ्या त्या वाड्यांतल्या व्यक्ति यांच्याविषयीं त्याला तिटकाराच वाटे.

भडकलेल्या मनःस्थितींत तो पुटपुटला,

—किती दुर्दैवी मी. च्.... या क्षणीं जर कुणीं मला विकत घेतलं असतं तर ? गुलामगिरीसुद्धां मीं आनंदानें पत्करली असती ! माझ्या भावी संपत्तींतल्या

अवघ्या दहापंधरा रुपड्या जरी कुणी आज माझ्या हातावर फेकल्या असत्या तरी मीं धन्यता मानली असती.

स्वतःला विकून घेण्याच्या कल्पनेनें त्याला कांहीं वेळ पछाडलेंच. महत्वाकांक्षा, धाडस आणि आत्मविश्वास यांच्या तारणावर पैसे देणारी एकादी पतपेढी असती तर त्यानें त्याच क्षणीं तिकडे धांव घेतली असती. स्वतःच्या विक्रीच्या कितीतरी कल्पना त्याच्या डोक्यांत घोळत होत्या.....

एका राजकारणी मुत्सद्द्यानें त्याला विकत घेतलें होतें. त्याचे मोठमोठे डाव केवळ आपल्या धाडसावर व बुद्धिमत्तेवर खेळले जाणार होते. भव्य योजना केवळ आपल्यावर विसंबून तो आंखणार होता.

दुसरा एक भांडवलदार त्याच्या आत्मविश्वासावर व ज्ञानावर खूष होऊन त्याला विकत घेत होता. आणि अरुण त्याची प्रत्येक अट मान्य करीत होता. जणू स्वतःचें व्यक्तित्व, अभिमान, सारें कांहीं तो विसरून गेला होता. त्याच्या नजरेपुढें एकच ध्येय होतें. आपण विजयी होऊं, संधि आली कीं तिचा आपण उपयोग करून घेऊं.

पण ते बेफाम विचार जास्त वेळ टिकले नाहींत. परत तो खुर्चीवर जाऊन बसला. त्यानें मनाशीं मात्र अगदीं निश्चय करून टाकला होता. गडद रात्र पडली, शांततेनें आपला बुरखा चोहोंकडे पसरला म्हणजे खिडकींतून फुटपाथवर उडी टाकायची. पण शारीरिक श्रम व मानसिक ताण या दोन्ही गोष्टींमुळें त्याचा जरा डोळा लागला.

एकाएकीं कसलीतरी अस्पष्ट कुजबूज त्याच्यावर कानावर पडली आणि तो खडबडून जागा झाला. खोलींतल्या त्या भयाण अंधारांत दिव्याचे मंद किरण पाहून तो थोडासा चमकलाच.

दिवा हातांत घेऊन दारावरचा भय्या उभा होता. कांहीं अंतरावर एक वयस्क बाई त्या भय्याकडे पहात उभी होती. भय्यानें अरुणकडे अदबीनें पहात म्हटलें,

— बाईसाहेबांना तुमच्याशीं कांहीं बोलावयाचें होतें, म्हणून मी आपणाला तसदी दिली, साहेब ...

पण इतक्यांत त्यानें खोलींत दिवा नसल्याचें पाहिलें. चटकन् खालीं जाऊन तो एक चिमणी घेऊन आला. त्याच्या गैरहजेरींत कुणीच कांहीं बोललें नाहीं. त्या अनोळखी बाईला त्या ठिकाणीं पाहून अरुणचें कुतूहल मात्र क्षणोक्षणीं वाढत होतें. भय्याच्या वागणुकींत जो एक प्रकारचा विलक्षण आदर, जी नम्रता दिसून येत होती त्यावरून मात्र त्याला कळून चुकलें कीं ती बाई त्या भय्याच्या ओळखीची आहे इतकेंच नव्हे तर तिचा त्याच्यावर विलक्षण ताबाही आहे.

— ठीक — भय्यानें हातांतली चिमणी टेबलावर ठेवीत म्हटलें — कुणी येणार नाहीं इथं आतां. तुम्हांला पाहिजे तें बोलायला हरकत नाहीं. मी हांकेसरशीं हजर होईन.

अरुण अगदीं भांबावून गेला होता त्या प्रकारानें. काय काम असेल हिचं आपल्याकडे? ना ओळख ना देख.... त्या बाईनें तोंडावर घेतलेला बुरखा जरा बाजूला सरकावला. वयाची चाळिशी उलटलेली, जरा कुरूपच, उंची बेताची, चेहरा जरा फिक्कटच; पण डोळ्यांत चमकणारें पाणी पाहून सहज कुणाचीही कल्पना व्हावी कीं ती मोठी संभावित, हुषार व धूर्त बाई असली पाहिजे.

तिला पूर्वी कुठें पाहिल्याचें अरुणला आठवेना. आपल्याकडे असलेली एकच खुर्ची पुढें करून अरुणनें तिच्याकडे प्रश्नांकित मुद्रेनें पहातांच ती म्हणाली,

— तुमच्याशीं एका अत्यंत महत्वाच्या कामासंबंधीं मला बोलायचं आहे. माझं नांव यशोदाबाई.

अरुणनें अंथरुणावर बसतां बसतां हातांची चाळवाचाळव केली. नुसतें यशोदाबाई या नांवावरून ती कोण, करते काय, रहाते कुठें याचा थोडाच उलगडा व्हायला. तिच्याकडून आणखी कांहीं माहिती मिळावी या हेतूनें तो स्तब्धच राहिला. पण ती बाईसुद्धां धीरेधीरेच घेत होती. तिनें कांहीं वेळ त्या लहानग्या खोलींत नजर फिरविली. कोणत्या शब्दांनीं विषयाला प्रारंभ करावा यासंबंधीं अजून तिचा विचार चालला होता. शेवटीं एकदांची तिनें बोलायला सुरवात केली. लाघवी शब्द, एखादा महत्वाचा मुद्दा असला कीं त्याला जरा हास्याचा दुजोरा, अशा थाटांत तिनें प्रारंभ केला.

— मला इथं पाहून तुम्हांला आश्चर्य वाटलं असेल, नाहीं ? वाटायचंच ! पण थोडक्यांत सांगायचं म्हणजे तुमची एक हितचिंतक म्हणूनच मीं इथं आलें आहें. तुमच्यासंबंधींच्या कांहीं गोष्टी मला कळल्या, माझं हृदय अगदीं कळवळून आलं. इथं येण्यांत माझा कांहीं स्वार्थी हेतु असेल अशी कल्पना तुम्ही करून घेणार नाहीं अशी आशा आहे. केवळ तुमच्या उपयोगी पडावं या एकाच शुद्ध हेतूनं मी इथं आलेली आहें. दैवाचा अदृश्य अन् सर्वव्यापी हात तुमच्यामागें शुक्लकाष्ठाप्रमाणें लागला आहे. आणि या जीवनकलहांत विजयी होण्याकरतां तुम्ही दुर्दैवाविरुद्ध किती धडाडीनं लढत आहांत आणि प्रयत्नांची परमावधी होऊनसुद्धां तुम्हांला किती कटु अनुभव मिळाले, सारीं स्वप्नं कशीं मृगजलवत् ठरलीं, याची मला कल्पना आहे. तुमच्या खासगी आयुष्यांत मला शिरावं लागत आहे, पण तुम्हीं मला क्षमा करालच. केवळ तुमच्याबद्दल सहानुभूति वाटते म्हणूनच मी हा मार्ग स्वीकारीत आहें.

अरुणनें तिच्या बोलण्याला कांहीं अडथळा केला नाहीं. त्याची जिज्ञासा जागृत झाली होती. आपल्यासंबंधींची अगदीं बारीकसारीक माहिती तिला भय्याकडून मिळाली असावी असा त्यानें सहज तर्क केला. अरुण उत्सुकतेनें तिच्याकडे पहात होता. यशोदाबाईना आपलें बोलणें पुढें चालू करायला कसलीच हरकत नव्हती. पण ती मोठ्या चातुर्यानें मूळ विषयाला वळसे देऊन, गोडगोड शब्दांनीं आपला हेतु लपवून धीरेधीरे, अरुणची उत्सुकता वाढवीत बोलत होती.

— तुमचं भवितव्य खास आशादायक आहे. तुमच्या प्रत्येक प्रयत्नाकडे, प्रत्येक हालचालीवर माझी नजर होती. अन् दुर्दैवाशीं टक्कर देण्याची तुमची प्रशंसनीय चिकाटी पाहून माझ्यावर फारच परिणाम झाला. थोडक्यांत सांगायचं म्हणजे तुम्हांला हात देणारी, प्रोत्साहन देणारी एकादी व्यक्ति मिळाली तर तुम्ही थोड्याच अवकाशांत उच्च पद मिळवाल असा मला भरंवसा वाटतो.

फिरून ती बाई स्तब्ध राहिली. अरुण काय उत्तर देतो याच्याकडे तिचें लक्ष लागलें होतें. अरुणला वाटलें, किती प्रेमळ बाई आहे ही. दुःखितां-

विषयीं सहानुभूति बाळगणारीं माणसें या जगांत कमीच. एकादी नोकरी तर घेऊन आली नसेल ना? किती अननुभूत संवेदनांनीं त्याच्या मनोवृत्ति थरारून गेल्या!

कोणतेंही काम करण्याची आपली तयारी असल्याचें त्यानें मोठ्या आशेनें आणि आनंदानें सांगितलें. त्यानंतर मात्र, त्या दोघांत जी एक गांभीर्याची अन् अविश्वासाची भिंत उभी होती ती ओलांडून यशोदाबाईनीं अगदीं उघडपणे विचारलें,

—तुमची लग्न करण्याची इच्छा आहे का, म्हणून मीं विचारलें तर काय उत्तर द्याल तुम्ही?

–लग्न!–आश्चर्यचकित होऊन अरुण उद्गारला–म्हणतां तरी काय तुम्ही? माझी गरिबाची थट्टा करून आपल्याला साधायचं तरी काय आहे? कुणीं सांगितलींत गरिबांना लग्नं?.... आणि माझ्यासारख्या सड्याफटिंगाशीं लग्न करायला तरी कोण तयार होईल?.... रस्त्यावरच्या भिकाऱ्याची पोरगीसुद्धां तयार होणार नाहीं. आणि त्यांत नवल तरी कसलं? स्वतःचं पोट भरायलासुद्धां असमर्थ असलेला मी.....

—अगदीं गैरसमज होत आहे तुमचा. मध्येंच बोलतें म्हणून रागावूं नका हं. एकादी श्रीमंताची पोरगी तुमच्याशीं विवाह करायला तयार असली तर आहे तुमची तयारी? पोरगी अत्यंत सुंदर आहे. वैभव पायाशीं लोळत आहे. थोरथोर लोकांशीं तिचे नात्याचे संबंध आहेत. तिच्याशीं लग्न केलंत तर तुम्हांला तुमची इच्छा असेल त्या पदाला सहज चढतां येईल.

क्षणभर अरुणला वाटलें कीं, त्या बाईला हांकलून लावावें. आपल्या खोलींत येऊन आपली थट्टा करायची म्हणजे काय? पण तिच्या चेहऱ्याकडे पाहतांच तो जरा गंभीर झाला. ती थट्टा असेल असें कांहीं त्या चेहऱ्यावरून दिसत नव्हतें. अरुणची चलबिचल झालेली पाहून यशोदाबाईनीं लाघवीपणानें म्हटलें,

—काय विश्वास बसत नाहीं माझ्या बोलण्यावर? या अशा अवेळीं मी इथं आलें ती काय तुमची थट्टा करायला?

— खरंच ! .... पण अटी तरी काय आहेत तुमच्या ? — साहजिकच कंपित स्वरांत अरुणनें विचारलें.

— ज्या मुलीसंबंधीं मी बोलतें आहें तिला कांही दिवस गेलेले आहेत. आणि घराण्याच्या अब्रूच्या दृष्टीनं तिचं लग्न तावडतोब होणं आवश्यक आहे. — कोणताही आडपडदा न ठेवतां यशोदाबाई म्हणाली. सारा पाल्हाळ बाजूला ठेवून तिनें मुख्य मुद्द्याला हात घातला होता.

त्या नीच बाईला त्याच क्षणी बाहेर हांकलून द्यायचा विचार उसळीसरशीं त्याच्या मनांत आला.

— किती हीन कृत्य करायला मला सांगत आहांत याचा विचार तुम्ही केलेला दिसत नाहीं – अरुण रागानें म्हणाला.

— छे ! तसं मुळींच नाही — यशोदाबाईनीं अत्यंत गंभीरपणाचा आव आणीत म्हटलें — तुम्हां तरुणांना सारासार विचारबुद्धि नाही म्हटलें तर तुम्हांला राग येतो. पण ती गोष्ट अगदीं खरी आहे. त्या पोरीशीं लग्न करण्यांत तुम्हांला हीनपणा वाटतो. पण मीं सांगतें त्याप्रमाणे वागलांत तर एका कुलीन घराण्याची अब्रू बचावल्याचं समाधान तुम्हांला लाभेल. मला तरी तें एक पुण्यकृत्यच वाटतें. आणि म्हणूनच अगदीं निर्हेतुकपणें मी त्या पोरीला मदत करायला तयार झालें. मुलीच्या बापाला यांतलं कांहींच माहीत नाहीं. खरं म्हणजे तिला दिवस गेले आहेत हेंसुद्धां अजून कुणाला कळलेलं नाहीं .... शक्य तितक्या लवकर तिचा विवाह करून टाकायची कल्पनाही माझीच. तिच्या त्या नाजूक परिस्थितीला नवराच कारण अशी साऱ्यांची कल्पना झाली, कीं या गोष्टीचा विशेषसा गाजावाजाही होणार नाहीं. त्या गरीब बिचाऱ्या पोरीवर असा केविलवाणा प्रसंग आणणारा चांडाळ विवाहित नसता तर गोष्ट वेगळी होती. पण.... माणसाचें पाऊल एकादे वेळीं चुकलें म्हणून तो नेहमींच पापी समजायचा का ? ....

आपल्या कृतीचें समर्थन करायला यशोदाबाई कितीतरी वेळ बोलत होती. अरुणनें तिला मुळींच अडथळा केला नाहीं. आणि अडथळा करण्याच्या मनःस्थितींतही तो नव्हता. त्याच्या मनांत शेंकडों विचार थैमान घालीत होते.

'कां म्हणून नाकारायची मागणी ? नुकतंच आपण ठरवलं नव्हतं का, कीं शक्य झालं तर स्वतःला विकूनसुद्धां टाकायचं ? यशोदाबाईनीं घातलेल्या अटी म्हणजे विक्रीचा करारनामाच नव्हे का ? कुणीतरी एक व्यक्ति आपल्याला विकत घ्यायची तयारी दर्शवीत आहे. नुसती देवघेव. आपण कुटुंबाचं नांव विकायचं. अन् त्याच्या मोबदला आपल्या महत्वाकांक्षा साध्य करून घेण्या-जोगा मानमरातब आपल्याला मिळायचा. हा एक प्रकारचा सौदाच नाहीं तर काय ?' आपला डागळलेला मळकट सूट त्यानें पाहिला. काल संध्याकाळपासून आपल्या पोटांत एक कणसुद्धां गेला नाहीं याची त्याला आठवण झाली आणि दोन महिन्यांतल्या कटु अनुभवांनीं आणि भंगलेल्या आशाअपेक्षांमुळें उत्पन्न होऊन हृदयांत लपून राहिलेला द्वेष नसानसांतून सळसळला. शेवटीं तोच विजयी ठरला होता. ज्या समाजानें त्याला आत्महत्या करण्याच्या पायरीवर आणून ठेवलें, त्याच्या सुखस्वप्नांचा निर्दयपणें चुराडा केला, त्याला तो आतां बुटांच्या ठोकरीनें सडकून काढणार होता.

— कबूल ! सारं कांहीं कबूल आहे मला — भावनावेगानें तो म्हणाला.

नंतर त्यानें यशोदाबाईना निःसंदिग्धपणें त्यासंबंधींची सारी माहिती विचारली. केलेल्या मध्यस्थीबद्दल तिची कांहीतरी अपेक्षा होती खास. त्या धूर्त बाईनें संभावितपणाचा आव आणून आपली निःस्वार्थ वृत्ति दाखविण्याचा प्रयत्न केला. पण शेवटीं आपल्या मागण्या तिनें चातुर्यानें पुढें केल्याच. त्या कामगिरीबद्दल अवघे पांच हजार मिळाले तरी आपलें समाधान होईल असें ती म्हणाली. सासऱ्याची सारी इस्टेट अरुणच्या हातीं आली म्हणजेच आपला त्या रकमेवर हक्क राहील असेंसुद्धां तिनें निक्षून सांगितलें. अरुणची त्यासंबंधीं कांहीं तक्रार नसल्यामुळें ती त्याच्याशीं जास्त उघडपणें बोलूं लागली.

— अगदीं पहिल्याप्रथम मला तुमचीच आठवण झाली. तुमच्या साऱ्या आशाआकांक्षांची मीं त्या पोरीला जाणीव करून दिली तेव्हां तिनंसुद्धां या विवाहाला पसंतीच दिली .... खरंच, हा विवाह म्हणजे कांहीं पोकळ व्यवहार नाहीं. पुढंमागं तुम्हीं माझे आभारच मानाल .... एखाद्या बड्या घराण्यांतला तरुणसुद्धां मला सहज मिळाला असता. माझ्या ओळखीचा आहे असा एक. मी जर या व्यवहाराच्या बाबतींत त्याच्याकडे गेलें असतें तर त्यानं माझी

मनधरणीच केली असती .... पण ज्या समाजांत ती मिसळते आहे त्याबाहेरचाच तरुण मीं जास्त पसंत केला ... यामुळें या प्रकाराला विशिष्ट रमणीयता येईल. प्रीतीच्या नाजूक फुलवेलीवर उगवलेली कळी म्हणतील लोक याला. प्रीतीला बंधनं अडवूं शकत नाहींत. राव अन् रंक हे भेदही तिला अडवूं शकत नाहींत..... अन् त्याशिवाय आणखी एक गोष्ट कबूल करावयाची म्हणजे अगदीं पहिल्या दिवसापासून मला तुमच्याविषयीं आपुलकीच वाटली..... सर्वसामान्यांपेक्षां तुमच्यांत कांहींतरी वैशिष्ट्य आहे. मी अगदीं शपथेवर सांगूं शकेन कीं, तुमच्या साऱ्या महत्वाकांक्षा सफल होतील. खात्री बाळगा कीं मी तुमच्या हितासाठींच झटतें आहें.

तिथपर्यंत यशोदाबाईनं कुणाचेंही नांव घेतलें नव्हते. अरुणच्या प्रश्नाचें उत्तर देतांना ती उठली आणि तिनें नवी माहिती दिली. मोठ्या उत्सुकतेनें अरुण तिचा शब्दान्‌शब्द आपल्या मनांत सांठवीत होता.

— ते शेजारचे सर निंबाळकर —या चाळीचे मालक— माहीत आहेत ना ? त्यांची बायको माझी दूरची नातलग आहे. ती वारल्यापासून घरचं सारं कांहीं मीच पहातें. उषा तर अगदीं माझ्या अंगाखांद्यावरच वाढलेली..... उषा म्हणजे कोण तें कळलंच असेल तुम्हाला. जिच्याविषयीं आपण आतां बोललों तीच उषा.

अरुणचा निरोप घेतांना तिनें पांचशें रुपयांच्या नोटा असलेला एक लखोटा टेबलावर फेकून दिला आणि मिस्कीलपणें हंसत ती निघून गेली. तात्पुरत्या खर्चाकरतां आगाऊ आलेली ती रक्कम म्हणजे अरुणाच्या गुलामगिरीचीं बंधनें होतीं.

अरुण खिडकींत येऊन उभा राहिला. रात्र अंधारी होती. त्या अंधारांत बागेंतलीं झाडें अस्पष्ट आकृति चितारीत होतीं. झाडांच्या झुबक्यांमधून वाड्यांतली एक प्रकाशित खिडकी दिसत होती. बहुधा उषेचीच खोली असावी ती. जी उषा एकाद्या सम्राज्ञीप्रमाणें मंदमंद पावलें टाकीत बागेंतल्या हिरवळीवरून जाई, पण एकदांसुद्धां तिनें त्या गरीब खोलीकडे नजर फेकण्याची

तसदी घेतली नव्हती तीच उषा आपलें भवितव्य ऐकण्याच्या उत्सुकतेनें आज यशोदाबाईंच्या वाटेकडे डोळे लावून बसली होती कीं काय तिकडे ....

ती उषा असो वा नसो. अरुणला त्याची थोडीच पर्वा होती. तिचा थोडाच संबंध होता त्या व्यवहाराशीं. अरुणनें आपली नजर दुसरीकडे वळविली. सभोंवार मुंबईचा मायामय विस्तार पसरला होता. मध्यरात्र केव्हांच उलटली असली तरी अजूनही झूं झूं असा स्वर ऐकूं येत होता, आणि अंधकाराचा प्रतिकार करणारे गॅसचे दिवे व रस्त्यावरची तुरळक रहदारी तिथून स्पष्ट दिसत होती.

## — २ —

पहिल्या पायरीवर पाय ठेवतांच अरुण थबकला. अजून त्याचा निश्चय होत नव्हता. बागेचें फाटक उघडून आंत येतांनाही त्याची मनःस्थिति अगदीं तशीच गोंधळून गेली होती. आंत जावें कीं जाऊं नये या विचारानें चारपांच मिनिटें तो फाटकापाशीं थांबला होता. आपण करतों आहों तें पाप तर नव्हे? पैशाकरितां, मानाकरतां आपण दुसऱ्याच्या दुष्कृत्याची जबाबदारी आपल्या शिरावर घेत आहों हा आपला अधःपात तर नव्हे? आपणाला पाहून उषेला काय वाटेल? निंबाळकर काय म्हणतील? जगाची काय समजूत होईल? .... किती हीन गोष्ट करण्याइतकी लाचार स्थिति झाली आहे आपली! त्यापेक्षां आपण मागं फिरलेलं काय वाईट? ...

पण शब्द गुंतला आहे ना? ....

हो. अन् याला पाप तरी कां म्हणावं? आपल्या हातून कधीं लहानशी तरी चूक घडली होती का? मग दैवाचं शुक्लकाष्ठ कां म्हणून आपल्यामागं लागावं? गरिबी म्हणजे या जगांतलं मोठं पाप .... पण ज्या जगानं गरिबी निर्माण केली, पापभीरु माणसांना पापकृत्यं करायला प्रवृत्त केलं, त्या जगाला आपण भ्यावं तरी कां म्हणून? ....

आज सकाळपासून अशा कित्येक परस्परविरोधी विचारांनीं त्याला भंडावून सोडलें होतें. अगदीं बेचैन मनःस्थितींत त्यानें आपले सारे व्यवहार उरकले होते. अन् मोठ्या प्रयासानें आपल्या मनावर ताबा ठेवून, तो यशोदाबाईंपाशीं कबूल केल्याप्रमाणें सर निंबाळकरांच्या भेटीकरतां आला होता. मनाचा निश्चय करून अरुण भराभर पायऱ्या चढून वर गेला. किती अकल्पित घटनेमुळें

आपण इथें येतों आहोंत, असा विचार अरुणच्या डोक्यांत येतांच त्याला थोडेसें हसूं आलें. आसपास नजर फेकीत त्यानें वाड्याचें निरीक्षण केलें. समोरची बागही पहायला तो विसरला नाहीं. ते उंचउंच हिरवेगर्द वृक्ष, त्या हिरवळीनें मढलेल्या पायवाटा, सुंदर सुंदर फुलांच्या ताटव्यांवर पसरलेली सावली, वृक्षांच्या भरगच्च पालवीमधून फुलझाडांवर पसरलेले सौम्य किरण आणि वेलींच्या जाळ्यांआडून दिसणारे कारंजाचे तुषार! किती रमणीय दृश्य होतें ते! आपण कुठें आलों आहों, कां आलों आहों, याचाही अरुणाला कांहींसा विसर पडला.

— काय पाहिजे ?

अरुणनें चमकून मागें वळून पाहिलें. आपणाला प्रश्न करणाऱ्या त्या व्यक्तीकडे पाहून तो क्षणभर गोंधळला. दार नीट उघडून ती व्यक्ति बाहेर आली. तिची ती भरदार देहयष्टि, वार्धक्याची किंचित् छाया पसरलेला तो उग्र चेहरा, भव्य कपाळ, अन् प्रत्येक हालचालींत प्रकट होणारा रुबाब आणि खानदानी बाणा इत्यादि गोष्टी पाहून अरुणनें सहज तर्क केला कीं ज्यांच्या भेटीकरितां आपण आलों ते निंबाळकर हेच असावेत.

— आम्हीं काय विचारलं तें नाहीं आलं लक्षांत? — जरा करारी आवाजांत ती व्यक्ति म्हणाली.

— रागावूं नका हं. एका अत्यंत महत्वाच्या बाबतींत आपल्याशीं बोलण्याच्या हेतूनं मी आलों आहे — नम्रपणें अरुण उद्गारला.

— आमच्याशीं ? — सर निंबाळकरांनीं क्षणभर अरुणला निरखून पाहिलें. चेहरा कांहीं त्यांना ओळखीचा वाटला नाहीं. वाट चुकून तर हा माणूस इथं आला नसेल ना, अशीसुद्धां त्यांना शंका आली.

—हो. आपणच सर निंबाळकर ना ? — अदबीनें अरुण उत्तरला.— आपलीच भेट घ्यायच्या हेतूनं मी इथं आलों आहें.

— अस्सं ! आलोंच आम्ही इतक्यांत — व्हरांड्यांतल्या एका बांका-कडे बोट दाखवून सरसाहेब आंत निघून गेले. अरुण त्या बांकावर निंबाळ-करांची आतुरतेनें वाट पहात बसला. कितीतरी वेळ तिथें एकटें बसावें

लागल्यामुळें तो अगदीं कंटाळून गेला. इतक्यांत येतों म्हणून सांगणारे सरसाहेब एक तास झाला तरी येत नाहींत, हें पाहून मात्र त्याच्या सहनशीलतेची सीमा झाली. सरसाहेबांच्या आळ्यताखोर स्वभावाविषयीं त्याचा प्रारंभींच वाईट ग्रह झालेला अन् त्यांत ही भर. अरुण अगदीं खवळून गेला. त्या अपमानित स्थितींत तिथें रखडत रहाण्यापेक्षां आल्या वाटेनें परत गेलेलें काय वाईट? एकदोनदां तर तो निघून जायच्या हेतूनें बांकावरून उठलासुद्धां. त्याच्या मनःस्थितींत अगदीं खळबळ उडून गेली त्या प्रकारानें.

—आपण गरीब! म्हणूनच निंबाळकरांना आपला असा अपमान करण्याचं धाडस झालं ....

इतक्यांत दरवाजा उघडून एक पट्टेवाला आला आणि त्यानें अरुणला म्हटलें,

—आपणाला बोलावलं आहे धनीसाहेबांनीं. या असे माझ्यामागून.

कांहीं जरुरीचं काम उपस्थित झाल्यामुळें आपणांला निकडीनं जावं लागलं, अशा तऱ्हेचा निरोप पाठवून सरसाहेबांनीं केलेल्या अपमानाची सव्याज भरपाई करून घ्यावी, गरिबांनाही स्वाभिमान असतो हें त्यांना पटवून द्यावं, अशी अरुणला इच्छा झाली, पण त्यानें मन आवरलें अन् तो पट्टेवाल्याच्या मागून निघाला. कित्येक दालनें ओलांडल्यावर त्यानें अरुणला एका भव्य दिवाणखान्यांत आणून सोडलें. प्रत्येक दालनांतलें मौल्यवान् सामान पाहून तो चकित झाला. त्या भव्य दिवाणखान्यांतलें उंची सामान पाहून तर तो स्तंभितच झाला. सभोंवार भिंतींना लटकावलेले प्रचंड आरसे अन् त्या आरशांत पडलेलीं, रंगीबेरंगी सोफयांचीं, चकचकीत झुंबरांचीं अन् मोठमोठ्या सोनेरी चौकटींच्या तसबिरींचीं प्रतिबिंबें वगैरे गोष्टी त्यानें आधीं कुठल्या पहायला!

आपण ज्या हेतूनं इथं पाय ठेवतों आहों तो आपला मूर्खपणा तर नव्हे ना? काय होईल या भेटीचा शेवट?....

विचार करीतच अरुण दिवाणखान्याच्या एका टोंकाला बसलेल्या निंबाळकरांकडे वळला. तिथें अगदीं शांतता पसरली होती. अरुणच्या पावलांचा आवाजसुद्धां त्या गुबगुबीत गालिच्यांत विरून जात होता.

—आम्हांला बिलकूल वेळ नाहीं आतां. तरीपण तुमची खेप फुकट जाऊं नये म्हणून तुमचं काय म्हणणं आहे तें ऐकून घ्यायला आम्ही तयार झालों. पण काय तें थोडक्यांत सांगून टाका....— अरुणकडे ऐटीनें पहात सरसाहेब म्हणाले.

त्यांच्या प्रत्येक शब्दांतून व्यक्त होणारा तो उपहास अरुणला बोंचल्याशिवाय राहिला नाहीं. दिवाणखान्यांत कितीतरी सोफा होते, खुर्च्या होत्या, पण आपणाला नुसतें बसायलासुद्धां न सुचविणाऱ्या त्या उग्र चेहऱ्याच्या माणसाकडे पाहून अरुणला त्याचा संताप आला. क्षणभर त्यांना टाकून बोलायलासुद्धां अरुणनें कमी केलें नसतें. पण परक्याच्या घरांत येऊन आपण त्याचा अपमान करणं म्हणजे असभ्यतेची कमालच नव्हे तर काय? इतरांनीं सभ्यपणा सोडला म्हणून आपणही त्यांचं अनुकरण करणं खास ठीक नव्हे, असा त्यानें विचार केला.

—आपला जास्त वेळ घ्यायची माझी मुळींच इच्छा नाहीं. पण विषय जरा महत्वाचा असल्यामुळें आपण माझं म्हणणं शांतपणें ऐकून घ्याल अशी आशा आहे.— अरुण आपला शांतपणा ढळूं न देतां म्हणाला.

—प्रस्तावना तर फार वाढली. जरा झटपट आटपाल का?— सर निंबाळकर आढ्यतेनें अन् आपल्या विनोदावर खूष होऊन म्हणाले. या उद्गारांनीं मात्र अरुणचें डोकें भडकून गेलें. आपण इतक्या अदबीनें, नम्रपणें बोलत असतांना आपणाला असें अपमानकारक उत्तर मिळावें याचें नवलही वाटलें त्याला. अपमानाचा वचपा काढण्याची हीच संधि आहे हें पाहून किंचित् कठोर स्वरांत अरुण म्हणाला,

—आपल्या मुलीला मागणी घालण्याकरितां मी या क्षणीं इथं आलों आहें.... माझी मागणी....

निंबाळकर केवढ्यानें तरी दचकले. क्षणभर अरुण काय म्हणतो तेंसुद्धां त्यांच्या लक्षांत आलें नाहीं. एकाएकीं कसला तरी धक्का बसल्याप्रमाणें त्यांचें मस्तक अगदीं बधिर होऊन गेलें.

— आपल्या मुलीवर माझं मनापासून प्रेम आहे. मी गरीब असलों तरी तिचंही माझ्यावर तितकंच प्रेम आहे.

-- पाजी माणसा, चालता हो इथून. नाहींतर धक्के खाऊन जावं लागेल — सरसाहेब त्वेषानें ओरडले. पण त्यांच्या धमकावणीकडे बिलकूल लक्ष न देतां निर्भयपणें अरुण पुढें म्हणाला,

— केवळ आपल्या मुलीच्या इच्छेनुसार मी ही मागणी घालण्याचं धाडस करतों आहें. तिची इच्छा .... तिचं सुख ....

— खोटं! साफ खोटं! माझ्या मुलीचं रस्त्यावरच्या भिकाऱ्यावर कधीं-काळीं प्रेम बसेल!.... अशक्य ....

— अशक्य वाटणाऱ्या गोष्टीही कित्येकदां या जगांत शक्य होतात. उषेचें माझ्यावर निस्सीम प्रेम आहे — निश्चयी स्वरांत अरुण उद्गारला. पण त्यावेळीं सदसद्विवेकबुद्धीनें त्याच्या मनाला भयंकर टोंचणी लावली होती. आपण धडधडीत किती खोटें बोलूं शकतों त्याचें त्याला आश्चर्य वाटलें.

— मूर्ख पोरगी! — अरुणच्या निश्चयी मुद्रेवरून तो म्हणतो आहे तें खरें असलें पाहिजे असें सरसाहेबांना पटलें म्हणून ते तावातावानें म्हणाले — पण माझ्या मुलीच्या भोळेपणाचा, भावनाप्रधानतेचा फायदा घेऊन तूं जरी तिला भुलवलंस, तिच्यावर भुरळ घातलीस, तरी लक्षांत ठेव कीं, ती माझी मुलगी आहे! एका जहागिरदाराची एकुलती एक मुलगी आहे! ती कांहीं रस्त्यावरच्या भिकाऱ्याला द्यायला काढली नाहीं मी. तिचं सुख कशांत आहे त्याची मला पूर्ण कल्पना आहे.

अरुण गंभीरपणें त्यांच्या प्रत्येक हालचालीकडे लक्षपूर्वक पहात होता. त्यांच्या हृदयांत चाललेलें वादळ शरिराच्या अणरेणूंतून प्रतीत होत होतें. त्या अनपेक्षित अन् अकल्पित प्रसंगामुळें त्यांच्या भावनांना प्रचंड धक्का बसला होता. त्या क्षणीं काय करावें तेंसुद्धां त्यांना सुचत नव्हतें.

— सरदारसाहेब, आपणाला दुखवावं लागत आहे याबद्दल मी दिलगीर आहें. पण ज्या थराला गोष्टी पोंचल्या आहेत तें लक्षांत घेतां आपण माझी मागणी स्वीकारणं जास्त शहाणपणाचं अन् आपल्या मुलीच्या कल्याणाचं आहे असं मी समजतों — यशोदाबाईंनीं पढविल्याप्रमाणें अरुण बोलत होता.

— म्हणजे? — निंबाळकर भेदरलेल्या स्वरांत म्हणाले.

—आपल्या मुलीला माझ्याशीं लग्न करण्याशिवाय दुसरा उपाय नाहीं. यापेक्षां जास्त कांहीं सांगतां येत नाहीं मला ....

असहाय्यपणें सरसाहेब सभोंवार पहात होते. आपण किती भयंकर पेंचांत सांपडलों आहोंत याची स्पष्ट कल्पना होतांच ते अगदीं बावरून गेले होते. झटकन् ते सोफ्यावरून उठले आणि दिवाणखान्यांत येरझारा घालूं लागले. क्षणभर एका क्रूर विचारानें त्यांचें डोकें भारून गेलें. आपल्या घराण्याच्या अब्रूला धक्का देणाऱ्या या पाजी माणसाला एकच शासन योग्य. अन् तें म्हणजे.... पण खुनाचा भेसूरपणा कल्पनेनें ताडतांच त्यांचें अंग थरारलें, शहारून गेले.

—मग काय ठरला आपला विचार ? माझ्या विनंतीला मान देतां ना ?– अरुणनें बेफिकीरपणें म्हटलें. निंबाळकरांनीं त्याच्या नजरेला नजर भिडविली, मनाशीं निश्चय केला अन् धमकावणीच्या स्वरांत म्हटलें,

—चालता हो इथून ! एक क्षणभरही इथं थांवूं नकोस.

—ठीक ! जशी आपली मर्जी.

जणू काय कांहींच झालें नाहीं अशा मुद्रेनें अरुण दरवाज्याकडे वळला. त्याच्या पाठमोऱ्या आकृतीकडे नजर जातांच निंबाळकरांच्या डोळ्यांपुढें कितीतरी दृश्यें उभीं राहिलीं. आपल्या मुलीच्या वर्तनानें आपल्या घराण्याच्या अब्रूला काळिमा लागला आहे, सारे प्रतिष्ठित लोक आपला तिरस्कार करताहेत, बहुजन-समाज आपल्या पोरीच्या शीलावर निर्दय कोरडे ओढीत आहे, चोहोंकडे आपली छीथू होत आहे ! ....

.... तीं काल्पनिक दृश्यें पाहून अब्रूनिष्ठ सरसाहेब चरकले. या साऱ्या अपमानास्पद गोष्टी टाळण्याचा मार्ग एकच अन् तो म्हणजे.... अरुणच्या मागणीला मान्यता देणें. केविलवाण्या स्वरांत निंबाळकर उद्गारले,

—जरा थांबा !

अरुण तिथेंच थबकला. निंबाळकरांच्या चर्येवरील बदल चटकन् त्याच्या लक्षांत आल्याशिवाय राहिला नाहीं. सर निंबाळकर टेबलाकडे वळले आणि त्यांनीं जोरानें घंटा वाजविली. पट्टेवाला धांवतच आला आणि अदबीनें, प्रश्नार्थक मुद्रेनें त्यांच्याकडे पहात राहिला.

— जा, ताबडतोब उषेला घेऊन ये.

पट्टेवाला निघून गेला. निंबाळकर आणि अरुण आपआपल्या जागीं स्तब्धपणें विचार करीत होते. तिथें पसरलेल्या शांततेचा भंग कुणीच करीत नव्हतें. उभयतांची उत्सुकता मात्र क्षणोक्षणीं वाढत होती.

कांहीं वेळानें दारांतला पडदा बाजूला सारून उषेनें तिथें प्रवेश केला. त्या साऱ्या प्रकाराची तिला पूर्ण कल्पना असल्यामुळे ती मुळींच बावरली नाहीं. झटकन् एकवार तिनें अरुणकडे नजर टाकली अन् आपल्या वडिलांना विचारलें,

— काय बाबा ? कां बोलावलंत मला ?

निंबाळकर कांहींच उत्तरले नाहींत. आळीपाळीनें ते त्या उभयतांकडे निरखून पहात होते. अरुणच्या मनःस्थितींत विलक्षण चलबिचल झाली होती. पण ते त्यांच्या लक्षांत आलें नाहीं. उषेच्या चर्येत मात्र किंचित्सुद्धां फरक पडला नव्हता. जणू भावनाशून्य, निर्विकार दगड !

— बाबा, सांगा ना ? – उषेनें फिरून प्रश्न केला.

निंबाळकर हळूहळू मागें फिरले आणि सोफ्यावर जाऊन बसले. किंचित् खिन्नतेनें त्यांनीं समोर पाहिलें. उषा त्यांच्या उत्तराची वाट पहात होती. मोठ्या मुष्किलीनें त्यांनीं आपल्या मनावर ताबा ठेवण्याचा प्रयत्न केला होता. अजूनही त्यांचें मन म्हणत होतें,

— पोरी, उषा, काय केलंस हें ?

वाऱ्याच्या एका झुळकेनें आंत प्रवेश केला. बाहेर बागेंत चिमण्या चिवचिवत होत्या. पालवी सळसळत होती. त्यांचा आवाज क्षणभर आंत शिरला.....

एक शब्दही न बोलतां सर निंबाळकर सोफ्यावरून उठले आणि विमनस्कपणें खोलींत सावकाश येरझारा घालूं लागले. अरुणही अजून स्तब्ध उभा राहिला होता. बिचारा अब्रूनिष्ठ म्हातारा ! क्षणोक्षणीं त्यांच्या चेहऱ्यावरचें गांभीर्य गडद होत चाललें होतें. अरुणापुढें अगदीं दीन, लाचार होण्याची पाळी आज आपल्यावर आली, अशी टोंचणी त्यांच्या मनाला लागलेली

दिसत होती. अरुणच्या निर्भय दृष्टीला दृष्टि भिडविण्याचें सामर्थ्यही त्यांच्यांत राहिलें नव्हतें. त्यांची ती केविलवाणी स्थिति पाहून अरुण क्षणभर गोंधळून गेला. त्या वृद्ध आणि मानी गृहस्थाशीं आपण जो हा खेळ चालविला आहे तो ठीक आहे का, असासुद्धां त्यानें स्वतःला प्रश्न केला.

--पोरी, उषा,— सर निंबाळकर म्हणाले — हे इथं अरुण आले आहेत. तुझ्या इच्छेप्रमाणें शक्य तितक्या लवकर विवाह उरकण्यांत येईल.

आणि इतकें म्हणून ते गंभीरपणें तिथून निघून गेले. जणू विवाह केव्हांच उरकला आहे अशी त्यांची भावना होती. दार लागतांच क्षणभर गंभीर शांतता पसरली. उषा आणि अरुण यांनीं एकमेकांकडे निरखून पाहिलें. दोघांनींही एकमेकांना यापूर्वीं जवळून कधींच पाहिलें नव्हतें. ती त्याला सुंदरच वाटली. चेहरा जरा फिक्कटच, पण त्यावर पसरलेली ती अभिमानी वृत्तीची छटा! तिचे तेजस्वी डोळे त्याच्याकडे अत्यंत तिरस्कारानें पहात होते. यशोदाबाईंकडून सारी हकीगत कळल्यावर बिचारी कितीतरी रडली असावी. पण अश्रु डोळ्यांवाटे बाहेर पडावयाच्याऐवजीं आंतच गोठून गेले असावे. त्या शांततेचा भंग करीत तीच प्रथम म्हणाली,

— बहुतेक सारं कांहीं आटोपलंच असेल, नाहीं ?

— हो. — अरुणनें निर्विकारपणें उत्तर केलें.

नकळतच तिच्या कपाळाला आंठ्या पडल्या. एक तीव्र कटाक्ष त्याच्याकडे फेकीत ती म्हणाली. जणू त्या कटाक्षाने ती त्याच्या हीन मनोवृत्तीचा दर्जा अजमावूं पहात होती.

— मला मोठी काळजी लागून राहिली होती. अशा तऱ्हेचं काम करायला कुणी तयार होईल, असं मला स्वप्नांतसुद्धां वाटलं नाहीं कधीं .... हा व्यवहार ....

त्या मोजक्याच शब्दांतून प्रतीत होणारा भयंकर तिरस्कार अरुणला असह्य वाटल्याशिवाय राहिला नाहीं. आपण कशा प्रकारच्या स्त्रीपुढें उभे आहोंत याची त्याला त्या थोडक्याच क्षणांत स्पष्ट कल्पना आली. त्यानें मान ताठ केली आणि निर्भयपणें तिच्याकडे निरखून पाहिलें. तिच्या वडिलांशीं

बोलतांना त्यानें कसोशीनें मर्यादा पाळल्या होत्या, सहनशीलतेची कमाल करून दुरुत्तरें ऐकून घेतलीं होतीं. पण तीं केवळ त्याला सर निंबाळकरांच्या मानी मनाची खात्री होती म्हणून. त्यांच्या मुलीशींही त्याच मर्यादा पाळणें जरूर होतें थोडेंच! जगाच्या दृष्टीनें तो स्वतः एक हीन कृत्य करायला तयार झाला होता. आणि उषासुद्धां अपराधीच होती.

—भलताच गैरसमज करून घेत आहांत आपण—अगदीं दाक्षिण्य-पूर्णतेनें आणि आवाजांत किंचितही कंप येऊं न देतां तो म्हणाला—आपण दोघंही ज्या परिस्थितींत आहोंत, अन् त्यांतून सुटका करून घेण्याकरतां जो मार्ग आपणाला स्वीकारावा लागत आहे, त्याला आपण दिलेलं 'व्यवहार' हें नांव मला तरी खास अनुदारपणाचं वाटतं. या क्षणापासून आपली दोघांचीही स्थिति एकाच प्रकारची आहे हें आपण विसरतां.

—अशी का तुमची कल्पना आहे?—उपहासगर्भ हास्य करीत उषा म्हणाली.

—निःसंशय! आपल्या दोघांच्याही परिस्थितींत काडीचाही फरक नाहीं.... तुमच्या हातून एक घोर, अक्षम्य चूक झाली. तुमच्या गतायुष्यावर मला मुळींच टीका करायची नाहीं. पण ओघाला आलं म्हणून म्हटलं. ती चूक लपवणाऱ्या नांवाची तुम्हांला जरुरी आहे. आणि तें मीं तुम्हांला देत आहें. आणखी मला संपत्ति पाहिजे, उच्च दर्जा पाहिजे. माझ्या महत्वाकांक्षा मला धाडसानें पार पाडल्या पाहिजेत. अन् तें सहाय्य मला तुमच्याकडून पाहिजे. आपण उभयतां जी एकमेकांना मदत करीत आहोंत त्याबद्दल आम्हीं परस्परांचे आभार मानणें अत्यंत आवश्यक आहे.

उषेच्या ओठांवरचें उपरोधिक हास्य केव्हांच पळालें होतें. क्षणभर तिच्या डोक्यांत विचारांचें केवढेंतरी काहूर उसळलें. त्याची निर्भय मुद्रा पाहून तर तिचा राग अनावरच झाला. आपल्या उचंबळल्या मनोवृत्तीवर संयम ठेवणें तिला बरेंच कठीण गेलें. कांहीं वेळानंतर ती म्हणाली,

—कबूल आहे मला आपलं म्हणणं. पण माझ्या अटी माहीत आहेत का आपणाला?

--नाहीं.— आपला नेहमींचा शांतपणा ढळूं न देतां तो उत्तरला — इच्छा असेल तर तुम्ही त्या मला आतांच सांगा. मी त्या पाळण्याचं वचन देतों.

उषेनें आढेवेढे घेतले नाहींत. अगदी स्पष्ट शब्दांत, चेहऱ्यावर थोडा-सुद्धां फरक पडूं न देतां तिनें आपल्या अटी पुढें मांडल्या.

— माझ्यावर तुमचा मुळींसुद्धां अधिकार रहाणार नाहीं. केवळ जगाच्या दृष्टीनं आमचं पतिपत्नीचं नातं राहील. एरवीं मला पूर्ण स्वतंत्रता पाहिजे. आपण जरी एकत्र राहिलों तरी तुमचा माझा काडीइतकाही संबंध रहाणार नाहीं.

उषेच्या प्रत्येक वाक्याला अरुण मान हालवून पसंती देई. खरं म्हणजे त्याचीसुद्धां तीच इच्छा होती. तो उत्तरला,

— आपल्याशीं प्रणयाचे खेळ खेळण्याची माझी इच्छा असती तर, आपल्या अनुदार अटी माझ्या हृदयाचं पाणीपाणी करताहेत, मन सुन्न करून टाकीत आहेत, असंच कांहींसं मीं म्हटलं असतं. पण मी प्रणयी वीर नाहीं. जीवन ही एक लढाई आहे, अन् तींत विजयी व्हायला पाहिजे, इतकंच माझं ध्येय आहे. प्रणय, प्रीति वगैरे नाजूक भावना म्हणजे या लढाईंतले अडथळे आहेत. आम्हां उभयतांच्या परिस्थितीबद्दल आपण इतक्या धैर्यानं अन् गंभीरपणं विचार करूं शकतां याबद्दल मला आपलं अभिनंदन करावंसं वाटतं.... आपल्या अटी मला मान्य आहेत. तरीपण मी तुम्हांला एकच विनंति करूं इच्छितों. मी जी तुम्हांला स्वतंत्रता देत आहें, तिचा दुरुपयोग जोंवर तुम्ही करणार नाहीं तोंवर मी तुमच्या स्वातंत्र्याच्या आड येणार नाहीं.... पण—

— चूप !— तिचा अभिमान जागृत झाला. ती जोरानें ओरडली.

अरुणनें आदरपूर्वक मान लवविली आणि तिला वाईट वाटून न घेण्याची विनंति केली. उभयतांची परिस्थिति नाजूक होती. चुकून गेलेला एकादादुसरा शब्द सहन करणें जरूर होतें. त्याशिवाय विस्कटलेली घडी नीट होणें अशक्यच होतें. पुढील संभाषणांत मात्र अरुणनें तिच्या गतायुष्याचा उल्लेख कसोशीनें टाळला.

बऱ्याच वेळानें अरुण तिचा निरोप घेऊन दरवाज्याकडे वळला. त्याच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पहातांच उषेच्या मनांत क्षणभर विचार आला, "आपलं भावी जीवन म्हणजे निर्जन अरण्यांतला प्रवास आहे! तिथं आपणाला गोळा करायला सुगंधी फुलं नाहींत, विहार करायला उद्यानं नाहींत.... नुसते कांटेकुटे भरलेले अन् त्या अरण्यांत आपण प्रवेश केला तोसुद्धां आडवाटेने...."

उषा अगदीं रडकुंडीला आली. अरुणशीं बोलतांना तिनें दाखविलेलें धैर्य, स्वतःच्या भवितव्याचा विचार करतांना पार पळालें. तिथल्याच एका सोफ्यावर तिनें अंग टाकले.

यशोदाबाईनीं आपल्या दुसऱ्या भेटींत उषेच्या अधःपतनाची साद्यंत हकीगत अरुणला सांगितली होती. उषेची फसवणूक करणारा चांडाळ तिच्याच एका मैत्रिणीचा नवरा होता. कल्याणला ती आपल्या मैत्रिणीकडे एक महिनाभर रहायला गेली होती. तिथेंच तिचा त्या चांडाळाशीं संबंध आला. तें कसें काय घडलें, उषेची त्याला कितपत संमति होती, याची मात्र तिला स्पष्टशी कल्पना नव्हती. पण त्या माणसानें बहुतेक उषेवर बलात्कारच केला असावा असें तिचें मत पडलें होते.

पडदा बाजूला सारून तो बाहेर पाऊल टाकणार तोंच एका नव्या कल्पनेने त्याला परत फिरविलें. उषेच्या समोर येऊन तो प्रेमळपणे म्हणाला,

—असं पहा. आपण अजून एकमेकांना पूर्णपणें ओळखत नाहीं, म्हणून म्हणतों, अगदीं या क्षणापासून, पहिल्या भेटीपासून आपण एकमेकांचा द्वेष करणं खास शहाणपणाचं नाहीं. कुणाला ठाऊक! आपण परस्परांना ओळखायलाच कदाचित् या चमत्कारिक प्रसंगामुळें एकत्र आलों असूं. तुम्ही माझा द्वेष करतां, तिरस्कारानं माझ्याकडे पहातां, याची मला जाणीव आहे; पण तुम्हांला माझं गतायुष्य माहीत असतं तर....

आणि उन्मादानें बेहोष झालेल्या माणसाप्रमाणें अरुणानें आपल्या खडतर जीविताचा इतिहास तिला सांगितला. सुखस्वप्नें चितारण्यांत रत्नागिरीला घालविलेले दिवस अन् दोन महिन्यांच्या अवधींत मुंबईत मिळालेले कटु अनुभव स्पष्टपणें सांगितले. त्यानंतर समाजांतल्या ढोंगांवर तो तुटून पडला. गरिबांवर

क्षणोक्षणीं चाललेला जुलूम त्यानें प्रत्यक्ष पाहिला होता. जगाची त्याला पर्वा नव्हती. न्यायनीतीच्या सोज्वळ नांवाखालीं जगांत चाललेली अंदाधुंदी त्याला दिसत होती. अन् असल्या जगाची आपण कां म्हणून पर्वा करावी, असें त्याला नेहमीं वाटे. समाजाला पायांखालीं तुडवून विजय मिळविण्याला आवश्यक असलेली धमक त्याच्यांत निःसंशय होती. त्याला सत्ता पाहिजे होती, उच्च दर्जा पाहिजे होता. आपलें ध्येय त्यानें सुस्पष्टपणें उषेला सांगितलें. संकटांची त्याला भीति वाटत नव्हती. बलवानांना संकटाची भीति अडवूं शकते का कधीं ?

—मी केवळ स्वार्थी आहें, हीन आहें अशी आपण कल्पना करून घेतली असेल—तो गद्गदलेल्या स्वरांत म्हणाला—आपल्या संपत्तीकरतां मीं स्वतःला विकून घेतलं नाहीं. केवळ आपल्या पैशाच्या जोरावर यशोमंदिराच्या पायऱ्या मी झरझर चढणार आहें ... माझ्या हृदयांत या क्षणीं किती विलक्षण झुंज चालली आहे ... दिवसभराच्या कटु अनुभवांनीं जमीनदोस्त झालेले सुखस्वप्नांचे मनोरे परत उभवितांना जागून काढलेल्या काळोख्या रात्री मीं कशा घालविल्या, निराश झालेल्या मनाला धीर देण्याचा प्रयत्न कसा केला तें जर आपणाला कळतं तर आपणाला माझी खरीखुरी ओळख झाली असती. अन् एका धाडसी, महत्वाकांक्षी माणसाला श्रेष्ठ दर्जा प्राप्त करून घ्यायला आपण हात देत आहोंत याचा आपणाला अभिमान वाटला असता.

ती निर्विकारपणें सारें ऐकत होती. एकाद्या स्नायूचीसुद्धां हालचाल झाली नाहीं. आज तीन दिवस अरुण स्वतःलाच प्रश्न करीत होता.

—बागेंतून हिंडतांना उषेनें आपणाला खिडकींत एकादे वेळीं पाहिलें असेल का ? नाहींतर यशोदाबाईंनीं सुचविल्याबरोबर उषेनें ताबडतोब त्या गोष्टीला संमति तरी कशी दिली असती ?

एक चमत्कारिक कल्पना त्याच्या हृदयाला चाटून गेली. आपण जर यशोदाबाईंच्या विनंतीचा अव्हेर करून उषेचा तिच्या अधःपतनाबद्दल तीव्र शब्दांत धिक्कार केला असता तर कदाचित् उषेला आपल्याविषयीं आदर वाटला असता.

तो स्तब्ध राहिला. उषा अजूनही निर्विकार होती. शेवटीं अरुण कांहींच बोलत नाहीं हें पाहून ती शुष्कपणें म्हणाली,

— माझ्या अटी आपल्या लक्षांत असतीलच ?

बिकट तह घडवून आणणाऱ्या एखाद्या मुत्सद्द्याच्या गंभीर आवाजांत अरुण म्हणाला,

— ठरलं तर. बरं, येतों मी.

अरुणनें जरा खिन्नपणेंच बाहेर पाऊल टाकलें. त्या अभिमानी स्त्रीचा हृदयपालट करण्याच्या हेतूला आपण नकळत बळी पडलों याचेंच त्याला राहून राहून वाईट वाटत होतें. ती अत्यंत सुंदर होती खरी. पण उभयतांच्यामध्यें प्रचंड भिंती असणेंच जास्त श्रेयस्कर होतें. मोठमोठ्या भराऱ्या मारण्याला तो आतां पूर्ण मोकळा होता.

# — ३ —

दहा वर्षांचा दीर्घ काल केव्हांच उलटला होता. सकाळचा सुमार होता. अरुण आपल्या काम करण्याच्या खोलींत बसला होता. अगदीं त्याच जागीं दहा वर्षांपूर्वी सर निंबाळकरांशीं त्याची पहिली भेट झाली होती. त्या पहिल्या मुलाखतींत सरसाहेब त्याच्याशीं किती मग्रुरीनें आणि ताठरपणें वागले होते! पण आज तीच खोली त्याच्या स्वतःच्या मालकीची झाली होती. कालांतरानें त्याच्या सासऱ्याने त्याच्याशीं अन् आपल्या एकुलत्या एका मुलीशीं मिळतें घेतलें होतें. सारा वाडा त्यांनीं त्यांच्याच हवालीं करून स्वतःकरतां बागेच्या टोंकाला असलेली टुमदार बंगली पसंत केली होती.

ह्या दहा वर्षांत अरुणनें आर्थिक अन् औद्योगिक बाबतींत केवढें तरी यश मिळविलें होतें. किती धडाडीनें त्यानें आपलें भांडवल उत्तरेकडल्या खाणींत गुंतविलें होतें! नुसत्या वैभवाच्या प्राप्तीनें त्याच्या अदम्य महत्वाकांक्षा थोड्याच तृप्त व्हायला. राजकारणांतसुद्धां आपणाला प्रभुत्व मिळावें अशी त्याची हांव होती. एक प्रांत जिंकल्यावर दुसरा प्रांत पादाक्रांत करण्याची इच्छा पराक्रमी धुरंधरांनाच होते.

आपल्या विभागातर्फे तो विधिमंडळाच्या सभासदत्वाकरतां निवडणुकीला उभा राहिला. अपेक्षेप्रमाणें तो प्रचंड बहुमतानें निवडून आला. विधि-मंडळांत राजकारणाचे डाव खेळतांना त्याला किती समाधान वाटे!

पण त्याच्या महत्वाकांक्षा वाढतच होत्या. अर्थशास्त्रांतला एक तज्ज्ञ म्हणून त्याची चोहोंकडे स्तुति होत होती. त्याच्या अंगांत धडाडी होती अन् परिणामकारक वक्तृत्वही होतें. एक दिवस स्वतःशींच तो पुटपुटला,

—आपण अर्थमंत्री झालों असतों तर....

सरकारपक्षाच्या मताला तो नेहमीं धूर्तपणें चिकटून असे. पण तरीसुद्धां आपल्या वैयक्तिक मतांवरच त्याचा जास्त भर होता. लोकमत त्यानें आपल्याकडे ओढून आणलें होतें अन् त्या जोरावर तो मंत्रिमंडळाला आपल्या इच्छेप्रमाणें, आपल्या मतांप्रमाणें वागावयाला भाग पाडी. गव्हर्नरसाहेबसुद्धां आपली ही लोकप्रियता जाणून आहेत याचीही त्याला खात्री होती.

कामाच्या रगाड्याखालीं अरुण अगदीं चिरडून गेला होता. तळमजल्यावर त्यानें आपली कचेरी थाटली होती. काम जोरांत चालू होतें. कितीतरी कारकून इकडून तिकडे चालले होते. कांहीं आपल्यापुढल्या जाडजाड फायली लक्षपूर्वक चाळीत होते. एकाददुसरा आदरपूर्वक बाजूच्या दिवाणखान्यांत शिरे.

नाण्यांचा नादमधुर आवाज अविरत ऐकूं येत होता. पैशांची देवघेव मोठ्या प्रमाणांत चालली होती. क्षणोक्षणीं तिजोऱ्या उघडल्या जात अन् त्यांत नाण्यांचा गोड आवाज कोंडला जाई.

बाहेर कितीतरी थोरथोर माणसें त्याची वाट पहात बसलीं होतीं. त्यांत अरुणच्या उपकारांची अपेक्षा करणाऱ्या व्यक्ति होत्या, वकील होते, डॉक्टर होते, व्यापारी होते, आणि राजकारणांतले मुरब्बीही पण होते. साऱ्या शहराला चेतना देणाऱ्या व्यक्ति त्या क्षणीं तिथें होत्या, असेंसुद्धां म्हणतां येण्यासारखें होतें. विधिमंडळांतले सभासदसुद्धां त्याच्या भेटीकरतां शांतपणें कित्येक वेळां तिथें तास तास ताटकळत बसत.

आणि अरुण आपल्या टेबलाशीं बसून सारे व्यवहार पहात होता. कित्येक संस्थानांतल्या कारभारांत त्याच्या मताला किंमत होती. त्याचीं बहुतेक सुखस्वप्नें सत्यसृष्टींत उतरलीं होतीं. साऱ्या जगाचे व्यवहार सूत्रबद्धतेनें चालविणाऱ्या जगड्व्याळ यंत्राचा आपण महत्वाचा खिळा आहोंत, आपल्या इच्छेवर कित्येक महत्वाच्या गोष्टींचं भवितव्य अवलंबून आहे असें त्याला साधार वाटत होतें.

अरुणनें टेबलावरची घंटा दाबली. पट्टेवाला अदबीनें पुढें झाला. अरुणची मुद्रा बरीच विचारी दिसत होती.

— काय रे, धनीण बाहेरून आली का ?

आपणाला तें माहीत नसल्याचें विठूने नम्रपणे सांगितलें. उषेच्या तैनातीला असलेल्या दासीला बोलावून आणण्याची अरुणनें त्याला आज्ञा केली. पण पट्टेवाल्यानें पाय उचलला नाहीं.

— साहेब, क्षमा करा मला — तो हळूच पुटपुटला — पण बाहेर मुख्य मंत्री आले आहेत ते आपणाशीं तांतडीनें बोलूं इच्छितात.

अरुणच्या मुद्रेवर क्षणभर त्याचा झालेला हिरमोड प्रतिबिंबित झाल्याशिवाय राहिला नाहीं. किंचित् रागीट आविर्भावांत तो म्हणाला,

— बरं! आलोंच मी इतक्यांत.

आदल्या दिवशींचीच गोष्ट. विधिमंडळांत एक महत्वाचे बिल चर्चेस आले होतें. अरुणनें त्या बिलाच्या कांहीं कलमांना कडून विरोध केला. सारें सभागृह त्यानें आपल्या वक्तृत्वानें दिपवून सोडलें. आणि त्याचा परिणाम मोठा जबरदस्त झाला. अरुणच्या सूचनांप्रमाणें दुरुस्ती करण्याकरतां तें बिल कमिटीकडे परत पाठविण्यांत आलें. बैठक बरखास्त झाल्यावर चोहींकडे अफवा उठली कीं, आपलें बिल नापास झाल्यासारखेंच वाटल्यामुळें अर्थमंत्री आपल्या जागेचा राजीनामा देतील, आणि त्या जागेकरतां अरुणची निवड होईल. अरुणनें नुसते खांदे उडविले. खरें म्हणजे अजून कांहीं ठरलें नव्हतें. कांहीं महत्वाच्या प्रश्नांवर त्याची गव्हर्नरसाहेबांशीं मुलाखत झाली होती इतकेंच! पण आतांच्या मुख्य मंत्र्याच्या भेटीवरून कितीतरी निष्कर्ष काढतां येणार होते. मघांपासून त्याला सतावणारे क्षुब्ध विचार त्यानें झाडून टाकल्यासारखे केले अन् मुख्य मंत्र्यांचें स्वागत करायला तो दाराशीं आला. त्यांच्याशीं हास्यमुद्रेनें हस्तांदोलन करीत तो आदरपूर्वक म्हणाला,

— आपले पाय या घराला लागले यावद्दल मला धन्यता वाटते. सरदारसाहेब, थोडा वेळ आपणाला ताटकळत ठेवल्याबद्दल मी आपली क्षमा मागतों.

कांहीं वेळ दोघेही अगदीं प्रेमळपणाचा आव आणून इकडल्या तिकडल्या गोष्टींसंबंधीं बोलत बसले. शेवटीं सरदारसाहेबांनीं आपल्या आगमनाचा हेतु

सांगितला. विधिमंडळांत पसरलेल्या अफवांत बरेंचसें तथ्य होतें. गव्हर्नर-साहेबांच्या इच्छेवरून सरदारसाहेब त्याची मुलाखत घ्यायला आले होते. अर्थमंत्र्याची जागा स्वीकारण्याची त्याची तयारी आहे कीं नाहीं? अन् असली तर कोणत्या अटींवर? वगैरे बाबींचा त्यांना अंदाज घ्यायचा होता. अरुणनें आपली शांतता तसूभरही ढळूं दिली नाहीं. त्या गंभीर शांततेच्या आवरणाखालीं विजयानंदाचे केवढें तरी थैमान चाललें होतें. अगदीं निःसंदिग्धपणें त्यानें आपल्या अटी विशद केल्या.

यशोमंदिराच्या कळसाला तो जाऊन पोंचला होता. आपल्या ध्येयाची अगदीं शेवटची पायरी तो आतां चढत होता. त्या पायरीवर पाय ठेवतांच सर्वांनीं त्याच्यापुढे आदरानें मान लवविली असती. गव्हर्नरसाहेबांची भेट घेऊन अरुणच्या साऱ्या अटी व कार्यक्रम त्यांच्यापुढें ठेवूं असें आश्वासन सरदारसाहेबांनीं दिलें.

संभाषण इतक्या थरावर येत आहे तोंच बाजूचा पडदा सरकवून उषेची दासी डोकावली.

अरुण एकदम पांढरा पडला. तोंडांतलें वाक्य अर्ध्यावरच टाकून तो तो उठला व मुख्य मंत्र्यांकडे वळून म्हणाला,

— क्षमा करा हं मला सरदारसाहेब. अवघ्या दोन मिनिटांत आलों मी.

झटकन् तो त्या दासीजवळ आला आणि त्यानें अगदीं हलक्या स्वरांत तिला कितीतरी प्रश्न विचारिले,

— उषा केव्हांशी बाहेर गेली? कुठें गेली असेल ती? किती वाजतां येईल?....

ती दासी धूर्तच होती. शब्दांत न सांपडतां तिनें अगदीं वरवरचीच माहिती दिली. या प्रश्नोत्तरांचा थोडकासुद्धां उपयोग नाहीं हें ध्यानीं येतांच तो म्हणाला,

— ती आली म्हणजे मला तिच्याशीं कांहीं बोलायचं असल्याची वर्दी दे बरं का?

त्याच्या त्या वर्तनाने सरदारसाहेब जरा गोंधळूनच गेले. खिडकींत उभे राहून ते बाहेर पाहात होते. पण त्यांची मुद्रा अत्यंत विचारी दिसत होती. अरुण त्यांच्याजवळच येऊन उभा राहिला. मध्येंच उठून गेल्याबद्दल त्याने त्यांची क्षमा मागितली. पण त्याची शांतवृत्ति ढळली होती. मोठ्या प्रयासानें तो जे कांहीं बोलला त्यांत कितीतरी असंबद्धता होती. सरदारसाहेबांना तें एक कोडेंच पडलें.

ते निघून गेल्यावर अरुण स्वतःशींच पुटपुटला,

—गेलं; सारं फुकट गेलं. ऐन वेळीं माझ्या मनःस्थितीनं मला दगा दिला.

कितीतरी वेळ तो विचार करीत बसला. आतां तो स्वतःवरच रागावला होता. त्यानंतर कितीतरी माणसांना त्यानें भेट दिली. एका इंजिनीयरनें एक फायदेशीर योजना सादर केली. त्या योजनेप्रमाणें एका खाणींत कांहीं भांडवल गुंतविल्यास प्रचंड नफा मिळण्याचा संभव होता. एक संस्थानी कारभारी कांहीं संस्थानी व्यवहाराच्या बाबतींत त्याचा सल्ला घ्यायला आला होता. निरनिराळ्या प्रकृतींचे अन् पक्षांचे लोक आले अन् निरनिराळ्या महत्वाच्या प्रश्नांसंबंधीं चर्चा करून गेले.

शेवटीं विधिमंडळांतल्या आपल्या मित्रांनाही त्यानें भेट दिली. प्रत्येक जण त्याच्या कालच्या सुंदर व्याख्यानाची तोंड फाटेपर्यंत स्तुति करीत होता.

आरामखुर्चीत मोकळेपणाने बसून अरुण ते प्रशंसोद्गार ऐकत होता. समाधानानें त्याचें हृदय भरून आलें होतें. पण त्या समाधानाचें अस्पष्ट प्रतिबिंबसुद्धां त्याच्या चेहऱ्यावर दिसत नव्हतें. शेजारच्या प्रशस्त दिवाणखान्यांतला नाण्यांचा आकर्षक आवाज अजूनही ऐकूं येत होता. कारकुनांची अखंड येजा तिथे चाललेल्या प्रचंड घडामोडीची कल्पना करून देत होती.

शेअरबाजाराचें भवितव्य आज बरेंचसें त्याच्या हातांत होतें. टेलिफोन क्षणभर हातांत घेऊन बाजारभावांत विलक्षण क्रांति करण्यास तो आज समर्थ होता. मोठमोठे राजेरजवाडे त्याच्या मैत्रीची अपेक्षा करीत होते. त्यांचे अंतःस्थ कलह बुजवून टाकणें किंवा प्रज्वलित करणें त्याला मोठेंसें कठीण नव्हतें.

सरकारचें अंदाजपत्रकही केवळ त्याच्या पाठिंब्यावर अवलंबून होतें. यशो-देवतेनें त्याला माळ घातली होती. पण ....

आज तो जेता असूनही उदास झाला होता.... आपल्या महत्वाकांक्षा सफल झाल्या कीं आपण सुखी होऊं अशी त्याची कल्पना; अगदीं समजूं लागल्यापासून, मनाशीं बाळगलेला हा भरंवसा ! पण आज सारें कांहीं त्याच्या हातीं असूनही त्याच्या मनोवृत्ति बधिर झाल्या होत्या. किती उदासवाणें वाटत होतें त्याला आज ! क्षणभर विजयोन्मादानें त्याचा चेहरा प्रफुल्लित होई. पण कांहीं वेळानें त्याच्या चेहऱ्यावर फिक्कटपणा पसरूं लागे. जणूं उन्मादाच्या ज्वालेमागें असलेल्या बर्फानें ती ज्वाला विझविली जाई.

मागें तो विजयाला आसावला होता. अन् त्या आशामय जीवनांत त्याला अननुभूत संवेदना झाल्या होत्या. पण आज? आपणाला एकादें शोककारक स्वप्न तर पडलें नाहीं ना, असेंसुद्धां क्षणभर त्याला वाटलें.

आणखी दोन तास उलटले; तरी उषा आली नाहीं. सर निंबाळकर घरीं आहेत कीं काय, हें पहायला अरुणनें पट्टेवाल्याला पाठवलें. विमनस्कपणें तो त्या खोलींत एकटाच येरझारा घालीत होता. बाहेर ताटकळत राहिलेल्या कित्येकांची भेट घेण्याला त्यानें नकार दिला. त्याच्या हृदयांत सकाळपासून चाललेली खळबळ हळूहळू उग्र स्वरूप धारण करीत होती.

उषा कुणाची तरी भेट घ्यायला गेली नसेल ना? कदाचित् तिला भ्रष्ट केलेला तो चांडाळ, तिच्या मैत्रिणीचा नवरा ! त्याच्याशींच तिचा संबंध नसेल कशा-वरून? अन् आतां तर तो विधुर झाला होता ! सहा महिन्यांमागेंच उषेची ती मैत्रीण वारली होती.

अरुणनें आपलें मन चळूं दिलें नव्हतें. आज दहा वर्षे उषेशीं केलेले करारमदार तो निष्ठेनें पाळीत होता. जगाच्या उपहासाला कारणीभूत होण्याची आपणावर पाळी येऊं नये, इतकीच त्याची इच्छा. ज्या समाजांत आपणाला श्रेष्ठ दर्जा लाभला आहे त्या समाजाच्या थट्टेचा विषय होण्याचा प्रसंग आपल्या पत्नीच्या वर्तनामुळें आपल्यावर येऊं नये म्हणून त्यानें कोणतेंही दिव्य केलें असतें.

पण आज एका नव्याच भावनेनें त्याला व्याकुळ करून सोडलें होतें. आपल्या पत्नीने अगदीं प्रामाणिकपणें वैवाहिक बंधनें पाळावीं, अशी गाढ इच्छा त्याला होत होती. लक्ष्मीला आपल्या पायांशीं लोळवीत आणण्याकरितां त्यानें कितीतरी अचाट साहसें केलीं होतीं. पण उषेला आपण कशी प्रसन्न करूं शकूं याचें त्याला कोडें पडलें होतें. उषा आपला तिरस्कार करते आहे... ती कधींतरी आपली होईल का ?....

इतक्यांत उषेनें खोलींत प्रवेश केला. नुकतीच ती बाहेरून येत होती. तिच्या दर्शनाबरोबर अरुण क्षणभर बावरला, त्याच्या आवाजांत कंप भरला. तसदी दिल्याबद्दल त्यानें तिची क्षमा मागितली. ती आल्याचें कळते तर स्वत: आपणच भेट घ्यायला आलों असतों असेंसुद्धां तो म्हणाला. पण त्याच्याकडे फारसें लक्ष न देतां तिनें उभ्याउभ्याच त्याच्याकडे प्रश्नार्थक मुद्रेने पाहिलें. जणूं तिला म्हणायचें होतें,

— काय सांगायचें तें लवकर आटपा कीं.

— उषा, आज कुठं गेली होतीस तूं ? मला तुझ्याशीं कांहीं बोलायचं होतं.

बराच वेळ तिनें उत्तर दिलें नाहीं. अरुणचा संशय दृढावला. कांहीं वेळानें त्यानें परत विचारलें,

— उषा, एका गोष्टीचा खुलासा होणं अवश्य आहे.... कुठं होतीस तूं इतका वेळ ?

आपल्या नवऱ्याच्या आवाजांतला कंप व अधिकारी वृत्ति तिला जाणवल्याशिवाय राहिली नाहीं. निर्विकारपणें ती उत्तरली,

— मला जावंसं वाटलं होतं तिथं.

— उषा, तूं इतकी बेफाम असशील अशी माझी कल्पना नव्हती. मला कबूल केलेलं इतक्यांत विसरलीस ? यापुढं सारं कांहीं बंद झालं पाहिजे. माझ्या नांवाला काळिमा लागावा इतक्या स्वैरपणें तुला वागतां येणार नाहीं.

उषेचे ओठ किंचित् विलग झाले. तिच्या हास्यांतून भयंकर उपहास व्यक्त होत होता.

— खरं ? .... विसरलंच मी. तुमच्या अब्रूचा प्रश्न माझ्या लक्षांतच नव्हता. नव्हे, मला आपलं वाटत होतं कीं, आपणाला आपल्या नांवाची मोठीशी किंमतच नाहीं. नांव विकणारीं माणसं ....

अरुणला तो अपमान, तो उपहास असह्य झाला. अपमानाचा बदला घेण्याच्या भावनेला बळी पडून तो म्हणाला,

— तूं कुठं होतीस तें मला माहीत नाहीं असं का तुला वाटतं ? तुझ्या त्या मैत्रिणीचा तो पाजी नवरा ....

— साफ चुकतां तुम्ही — जाग्यावरून तसूभरही न हलतां ती निर्धारानें म्हणाली — तुम्ही म्हणतां त्या माणसाचं तोंड मीं पुन्हां कधीं पाहिलं नाहीं .... पण माझा एखादा प्रियकर असता तरीसुद्धां मला दोष देण्याचा तुम्हांला काडीचाही अधिकार नाहीं. माझी इच्छा तुमच्या कोणत्या कार्याच्या आड आली ? .... तुम्ही स्वतःच माझ्या अटी विसरूं पहातां ....

धुंद नजरेनें त्यानें क्षणभर तिच्याकडे पाहिलें. त्याचा कंठ भरून आला. दीर्घकाल आवरून धरलेल्या प्रेमाचा ओघ मुक्त करून त्यानें गद्गदलेल्या स्वरांत म्हटलें,

— उषा, उषा, माझं तुझ्यावर प्रेम आहे ! ....

अरुण गुडघे टेकून तिच्या पातळाचा कांठ धरून याचना करीत होता. पूर्ण बेफिकिरीने, ताठरपणें ती मागें फिरली.

— उषा, उषा ! मी तुझ्यावर प्रेम करतों आहें .... याक्षणीं तुझ्या प्रीतीशिवाय मला कांहीं सुचेनासं झालं आहे. अगदीं वेडा झालों आहें मी .... ही प्रीतीची भावना माझ्या हृदयांत केव्हां आणि कशी शिरली हें मला कळलंसुद्धां नाहीं .... पण आज दहा वर्षे मी या यातना सहन करतों आहें. हृदयाची भूक असह्य होत आहे. या भावनेशीं मी किती झुंजलों, तिचीं पाळंमुळं खणून काढण्याकरतां किती आटोकाट प्रयत्न केले याची तुला कल्पनाही येणार नाहीं .... कित्येकदां पहिल्या भेटींतला तो अपमानकारक प्रसंग डोळ्यांपुढं आणला. मी तुला विसरूं पहात होतों. पण .... अखेर प्रीतीच विजयी ठरली. उषा, तूं माझी होशील ? ....

कितीतरी वेळ तो केविलवाण्या मुद्रेनें बोलत होता. त्याच्या आकांक्षांचे सारे गगनचुंबी मनोरे कोलमडून पडले होते. स्वतःच्या कणखर वृत्तीचा त्याला केवढा अभिमान! साऱ्या जगाचा डोलारा सावरूं शकणारी अशी प्रचंड शक्ति कोणती असेल तर ती मानवी इच्छाच .... तिला अशक्य असें कांहींच नाहीं असें त्याला नेहमीं वाटे. पण आज तोच वीर एका स्त्रीच्या पायाशीं प्रीतीची याचना करीत होता, एकाद्या बालकाप्रमाणें हतप्रभ झाला होता. ज्या ध्येयाच्या ध्रुवताऱ्याकडे नजर ठेवून त्यानें उच्च स्थान मिळविलें होतें त्याचा त्याग करावयालासुद्धां तो उद्युक्त झाला होता. त्याच्या मोबदल्यांत त्याला त्या मानी स्त्रीच्या प्रेमाची भिक्षा पाहिजे होती. आपणाला हात देऊन तिनें आपला उद्धार करावा, आपल्या तप्त कपाळाचें चुंबन घ्यावें असें त्याला वाटत होतें. आजपर्यंत मिळविलेल्या विजयाचा त्याला विसर पडला होता. तिजोरींतल्या नाण्यांचा निनाद त्याला भुरळ घालूं शकत नव्हता. मुक्तकंठानें त्याचे स्तुतिपाठ गाणाऱ्या भाटांकडे त्याचें लक्ष नव्हतें. प्रत्यक्ष गव्हर्नरसुद्धां अर्थमंत्र्याची जागा स्वीकारण्याकरितां त्याला गळ घालीत होते. पण अरुणला या क्षणीं त्या गोष्टी कवडीमोल वाटत होत्या. त्याला उषा पाहिजे होती. तिनें नकार दिला असता तर आपण अगदीं अकिंचन आहोंत, असमर्थ आहोंत, दुर्दैवी आहोंत असेंच त्याला वाटलें असतें.

—ऐकलंस, उषा? आजपर्यंत मी जें काय केलं तें सारं तुझ्या पायाशीं अर्पण करण्याकरतां. प्रारंभीं मला तुझी आठवणसुद्धां होत नव्हती. माझ्या आकांक्षांच्या पूर्तीसाठीं मी झटत होतों. पण दिवसांमागून दिवस गेले अन् मला कळून चुकलं कीं, तुझ्या प्राप्तींतच माझ्या ध्येयांची पूर्ति आहे. तुझ्या प्रेमाला पात्र ठरण्याकरतांच उच्च दर्जा, मानसन्मान मिळविण्याची मला लालसा झाली. बुद्धि, चिकाटी आणि बल यांच्या जोरावर मिळविलेलं सर्वस्व पाहून एक दिवस तरी तुझ्या हृदयाला पाझर फुटेल असं मला वाटत होतं..... उषा, चुकलों मी? अजूनही मी तुझ्या क्षमेला पात्र ठरूं शकत नाहीं का? उषा, माझा तिरस्कार करूं नकोस....

प्रयासानें इतका काळपर्यंत कोंडून ठेवलेल्या भावनांचे कढ बाहेर निघत होते. गुदमरलेल्या भावनांना तोंड फुटलें होतें. पण उषेचे ओठ अजूनही

मिटलेलेच होते. निर्विकारपणें ती इतकेंच पुटपुटली, – उठा ना! कुणी पाहिलं तर.... ?

अरुण उठला नाहीं. त्याची याचना चाललीच होती. असूयेमुळें त्याची शांत वृत्ति ढळली नसती तर त्यानें आणखीही वाट पाहिली असती. पण मत्सरामुळें उत्पन्न झालेलें वादळ शमविणें त्याच्या शक्तीबाहेरचें होतें. अत्यंत केविलवाण्या मुद्रेनें त्यानें म्हटलें,

— उषा, अजूनही तुला माझा तिटकारा येतोय! .... तरीही हरकत नाहीं. दुसऱ्या कुणावर मात्र प्रसन्न होऊं नकोस. यापुढे मी याच्याहीपेक्षां मोठीं दिव्यें करून तुला खूष करीन .... मघाशीं मी अडाणीपणानं वागलों. डोकं अगदीं फिरून गेलं होतं माझं. पण दया कर. एक दिवस माझ्यावर तुझं प्रेम बसेल ही आशा मात्र भंगवूं नकोस .... नुसत्या आशेवरच मी जगेन ....

— अशक्य! — उषा निधारानें म्हणाली आणि अरुण अजूनही गालिच्यावर बसलेला पाहून ती दरवाज्याकडे वळली.

त्या कठोर शब्दानें अरुणचें डोकें भडकलें. त्वेषाच्या झटक्यांत तो बेभानपणे उठला, आणि त्यानें उषेचें मनगट पकडलें. एका क्षुल्लक, पतित स्त्रीकडून आपला धिक्कार व्हावा! .... आपणाला अशक्य असं काय आहे? भोंवतालच्या वातावरणांत विलक्षण खळबळ उडविण्याचें सामर्थ्य आपल्या हातांत असूनही एका स्त्रीच्या प्राप्तीकरतां आपण स्वाभिमानसुद्धां बाजूला ठेवला. आणि त्याच स्त्रीकडून आपला असा अपमान व्हावा! एकादें बालक आपणाला नको असलेलें खेळणें भिरकावून देतें त्याप्रमाणें तिनें आपल्याशीं वागावें! .... केवढा अनुदारपणा हा! त्याला ती कल्पनाच मुळीं असह्य वाटली. त्याच्या मनोवृत्ति क्षुब्ध झाल्या. भावनावश होऊन त्यानें उषेचें मनगट निर्दयपणें आवळलें आणि तो कठोरपणें म्हणाला,

— उषा, मला तूं हवी आहेस ....

— पण मला तुमची मुळींच जरुरी नाहीं! — उषेच्या चेहऱ्यावर क्षणभर पांढुरकी छटा पसरली, पण तिचा निर्धार मात्र वाढला होता.

कांहीं वेळ त्यांची झटापट चालली. उषा आपलें मनगट सोडवून घेऊं पहात होती. इतक्यांत दरवाज्यांत पावलें वाजलीं, सर्रकन् पडदा बाजूला झाला. सर निंबाळकर होते ते! अरुणनें उषेचा हात सोडला. आणि त्यांच्याकडे वळून म्हटले,

—हें दृश्य पाहून आश्चर्य वाटलं असेल तुम्हांला. नाहीं? क्षमा करा मला. भावनेच्या भरांत स्वतःला मी अगदीं विसरून गेलों होतों.... पण माझ्या आत्तांच्या मनःस्थितींत कुणीही असंच वागला असता. आपली मुलगी यावेळीं कुठून आली असेल याची आपणाला कल्पना तरी आहे का? पतीवर प्रेम नसलं तरी त्याच्या नांवावर शिंतोडे पडूं न देणं पत्नीचं कर्तव्य आहे. स्वेच्छाचार करतांना मनाची नाहीं तरी जनाची लाज ठेवायला नको का? पतीचं शील....

सर निंबाळकर हळूहळू वार्धक्याच्या आहारीं जात होते. ती दांडगाई पाहून त्यांना धक्का बसल्याशिवाय राहिला नाहीं. दरवाज्यांत बराच वेळ ते दगडाप्रमाणें निश्चल उभे होते. त्या जोडप्यांत एकी आहे, प्रीतीच्या दुव्यानें त्यांचीं हृदयें निगडित झालीं आहेत, पण आपापल्या सामाजिक दर्जातलें अंतर मात्र तीं शक्य तों पाळीत आहेत, असा निष्कर्ष, त्यांची एकमेकांशीं चाललेली वागणूक पाहून, त्यांनीं काढला होता. उषा अरुणाची पत्नी असली तरी एका खानदानी घराण्यांतली एकुलती एक मुलगी होती. अन् अरुण चार हात जमिनीचा तुकडाही नसलेल्या गरीब बापाचा मुलगा होता. आपल्या खानदानी घराण्याबद्दल वाटणाऱ्या गाढ अभिमानामुळें सरसाहेबांना नेहमीं वाटे कीं, त्या उभयतांच्या वागणुकींत योग्य अंतर असणंच चांगलं! आपल्या जांवयाच्या बुद्धिमत्तेबद्दल त्यांना आदर वाटत नव्हता असें नव्हे. त्याच्या जबर कर्तृत्वशक्तीबद्दल ते कधीं कधीं त्याला शाबासकीही देत. पैशांची पर्वा न करतां एखाद्या सट्टेबाजाप्रमाणें बेदरकारपणें तो संकटांत उडी घेऊं लागला कीं त्याला दोष द्यायलाही ते कमी करीत नसत. पण अरुणाच्या अपेक्षेप्रमाणें तो विजयी झाला कीं त्यांना वाटूं लागे, खरंच, अरुण चुकत नव्हता, चूक आपलीच होती!

आणि कधीं कल्पनासुद्धां केली नव्हती असला प्रसंग दैवयोगानें त्यांना आज पहावा लागत होता.

अरुणानें आपल्या पत्नीवर केलेला किळसवाणा आरोप पाहून निंबाळकर जरा पुढें सरकले. उषा दहा वर्षांची असतांना ते तिला ज्या शिस्तींत वागवीत होते तीच शिस्त आज ती विवाहित असूनही चालत होती. शिस्तीवर त्यांचा भारी कटाक्ष. त्यांच्या नसानसांत खेळणारें खानदानी रक्त सळसळलें.

— संकेतस्थळीं प्रियकराची भेट घेऊन ती आत्तांच परतत आहे. पण किती निर्लज्जपणें मला दुरुत्तरें करते आहे.— अरुणनें उपहासगर्भ नजरेनें तिच्याकडे पहात म्हटलें.

आपल्या पतीचे ते कटु शब्द ऐकून उषेनें झटक्यासरशीं मान वळविली. तिच्या डोक्यांत परस्परविरोधी भावनांचे केवढें वादळ चाललें होतें! सरसाहेबांनीं कठोरपणें तिला प्रश्न केला,

— उषा, खरं का हें? तुझ्या नवऱ्याने केलेल्या आरोपांत तथ्य आहे का?.... या म्हातारपणांत हा आणखी एक धक्का मला तूं दिलास....! कुठून दुर्बुद्धि सुचली तुला ही! घराण्याची अब्रू.... एका व्यक्तीच्या दुष्कर्मानें साऱ्या कुटुंबाच्या नांवाला काळोखी फांसली जाते ...

उषेनें क्षुब्धपणें सभोंवार पाहिलें. आपल्या वडिलांचीं दुरुत्तरें सहन करतांना तिच्या हृदयाला घरे पडत होते. वडिलांचें शंकासमाधान करणे तिला मोठेंसें अशक्य वाटत नव्हतें. पण तो जिवावरचा खेळ होता.....

पण उषेचा बेफिकीरपणा पाहून त्यांची शांत वृत्ति भडकून गेली होती. घराण्याच्या, कुलशीलाच्या पावित्र्याबद्दलचा त्यांचा जाज्वल्य अभिमान दुखावला होता. निर्दयपणें उषेवर तोंडसुख घेऊनही ती कांहीं बोलत नाहीं हें पाहून काकुळतीनें ते म्हणाले,

— उषा, तुला तुझी बाजू मांडायची इच्छा नाहीं?

—क्षमा करा मला बाबा, त्यांच्यासंबंधीं एक शब्दही बोलायला मला भाग पाडूं नका. तुमच्याविषयीं वाटणारा आदर मला स्पष्ट बोलूं देणार नाहीं. आपल्या सोंगाची बतावणी त्यांना योग्य रीतीनें करूं द्या.... या माणसाला ओळखत नाहीं तुम्ही....

—पण तो तुझा नवरा आहे—निंबाळकर मध्येंच म्हणाले – तुझ्या मुलाचा बाप आहे!

उषेनें आपल्या क्षुब्ध मनोवृत्तीला घातलेला संयमाचा बांध ह्या एकाच वाक्यानें पुरता फुटून गेला. ताठ उभी राहून ती भावनेच्या आवेगांत म्हणाली,

—नाहीं! नाहीं! माझ्या मुलाचा तो बाप नाहीं.... इतका काळ मी तुमच्याशीं प्रतारणा केली. पण या क्षणीं मला तुमच्याशीं सारं उघड करायचं आहे..... तुमचा सर्वांचा समज झाला असेल कीं आम्हां उभयतांचं एकमेकांवर निस्सीम प्रेम आहे. तसा गैरसमज करून देण्याला मीच कारणीभूत झालें. पण खरं सांगायचं म्हणजे या माणसाचं माझ्यावर कधींच प्रेम नव्हतं अन् विवाहापूर्वी मींही त्याला कधीं पाहिलं नव्हतं. मला भुरळ घालून फस-विण्याचंही त्याच्या मनांत कधीं नव्हतं. तसं असतं तर त्याच्या अपराधाची गंभीरता जरा कमी झाली असती. पण नाहीं.... या माणसानं स्वतःला माझ्या संपत्तीला विकून घेतलं. संपत्तीच्या मोबदल्यांत दुसऱ्याच्या अपराधाची जबाबदारी आपल्या शिरावर घेण्याचा सौदा यानं पत्करला.... विचारा हवं तर....

निंबाळकरांनीं अरुणकडे वळून पाहिलें. त्याचा चेहरा पांढरा पडला होता.

—ऐका, बाबा!—उषेनें आपलें हृदयाविष्करण पुढें चालवलें—पैशा-करतां गुलामगिरीसुद्धां पत्करण्याइतका निर्लज्जपणा.... हीनपणा.... कधींच प्रेम नव्हतं माझं त्याच्यावर. माझ्या पायालासुद्धां मी त्याला कधीं स्पर्श करूं दिला नाहीं. अकल्पितपणं माझ्या हातून घडलेल्या चुकीमुळं तुम्हांला धक्का बसला असता, दुःख झालं असतं, म्हणून तुमच्यासमोर खोटं बोलण्याकरतां या माण-साला मीं विकत घेतलं.... त्याच्या तोंडाकडे पहा.... मी सांगतें तें खोटं कीं काय तें कळेल तुम्हांला.

अरुणनें आपलें तोंड दोन्ही हातांनीं झांकून घेतलें. एकामागून एक येणाऱ्या त्या लाटा त्याचें हृदय विदीर्ण करून सोडीत होत्या.

—आणि आज—उषा पुढें म्हणाली—मीं आपणावर प्रेम करावं अशी याची इच्छा.... म्हणून यानं माझ्या पायांशीं लोटांगण घातलं, अश्रु गाळले, रडगाणीं गायलीं, अत्यंत हीनपणें नाटक केलं. इतके दिवस तुमची फसवणूक केल्याबद्दल, मला क्षमा करा. सांगा बाबा, यापुढें या माणसाशीं मीं संसार

करावा असं तुम्हांला वाटतं ?.... सारा प्रकार तुम्हांला कळला आहे. मला इथून ताबडतोब घेऊन जा, या घरांत यापुढें एक क्षणही मी राहूं इच्छीत नाहीं. मघां माझ्यावर बळजबरी करूं पहात होता तो !

वार्धक्यानें बांक आलेली निंबाळकरांची कृश देहयष्टि ताठ झाली. मुलीच्या हातांत आपला हात देत ते दरवाज्याकडे वळले. त्यांना थांबवण्याकरतां अरुणच्या तोंडांतून एकादा उद्गार निघायच्या आंतच त्या दोघांनीं दिवाणखान्याबाहेर पाऊल टाकलें. पडदा बाजूला सारतांना मात्र सर निंबाळकर ओठांतल्या ओठांत पुटपुटले,

— बरं, येतों आम्ही.

अन् त्यानंतर जोरानें दार ढकललें गेलें. अरुण वेड्यासारखा समोर पहातच राहिला. आपण कोणत्या तरी अदृश्य शक्तीच्या भाराखालीं हळूहळू चिरडून जात आहोंत असें त्याला वाटलें.

इतक्यांत पट्टेवाल्यानें अदबीनें खोलींत येऊन टेबलावर एक लिफाफा ठेवला. एकाद्या यंत्राप्रमाणें अरुणनें तो उघडला अन् त्यावरून नजर फिरविली. गव्हर्नरसाहेबांनीं मुक्तकंठानें स्तुति करून त्याची अर्थमंत्र्याच्या जागेवर नेमणूक केली होती. पण त्या अत्यंत आनंदाच्या अन् महत्वाच्या बातमीनें त्याच्या वृत्ति खुलल्या नाहींत. उलट चेहऱ्यावरचा फिक्कटपणा जास्तच वाढला. त्याचीं बहुतेक सुखस्वप्नें फळाला आलीं होतीं. अन् तरीही त्या क्षणीं त्याला किंचित्सुद्धां आनंद झाला नाहीं.

समोरच्या दिवाणखान्यांत नाण्यांचा गोड निनाद क्षणोक्षणीं वाढत होता. अरुणच्या कचेरींत प्रचंड उलाढाली होण्याची तीच वेळ होती. सारे कारकून कामांत गर्क होऊन गेले होते. आणि तो मात्र त्या साऱ्या पसाऱ्याकडे एकाद्या माथेफिरूप्रमाणें पहात केविलवाण्या बालकाप्रमाणें म्हणत होता.

— किती दुर्दैवी मी.... माझं सुख.... !

टेबलावर डोकें ठेवून कितीतरी वेळ तो निश्चल बसला होता आणि गालावरून ओघळणारे अश्रु त्याला अर्थमंत्र्याची जागा देणारा तो खलिता भिजवीत होते.

— ४ —

आज दीड वर्ष अरुण अर्थमंत्र्याच्या जागेवर काम करीत होता. त्रास-दायक कामाच्या रगाड्याखालीं चिरडून जाऊन आपल्या हृदयाच्या वेदना तो विसरूं पहात होता. तो भयंकर प्रसंग घडला त्याच्या दुसऱ्या दिवशीं अरुणने आपल्या सासऱ्याची भेट घेतली, विनवण्या केल्या, उषा विभक्त राहिली तर त्यामुळें समाजांतल्या आपल्या स्थानाला किती विलक्षण धक्का बसेल, लोकांच्या उपहासाला आपण कसे पात्र होऊं याचें सुस्पष्ट चित्र त्यांच्यापुढें रंगविलें अन् केवळ वडिलोंच्या आग्रहाप्रमाणें, उपदेशाप्रमाणें समाजाच्या डोळयांत धूळ फेकण्याकरतां, आपलें सोंग योग्य रीतीनें वजावण्याच्या तयारीनें उषा परत घरांत आली.

अत्यंत महत्वाचें अन् निकडीचें काम असलें तरच अरुण घराबाहेर पडे. नाहींतर दिवसभर आपल्या कामांत मग्न जायचा तो. काळोख पडूं लागला कीं तो आपल्या साऱ्या सेक्रेटरींना दुसऱ्या दिवसाचें काम समजावून देई.

अरुणच्या आयुष्यातला हा काल म्हणजे अत्यंत घडामोडींचा. या कालां-तच त्याचें धाडस, त्याचा अदम्य आत्मविश्वास कसास लागला. घडोघडी त्याला अपेक्षेबाहेर यश मिळत होतें. कुणालाही वाटावें कीं एकाद्या यक्षाची अरुणच्या अंगच्या गुणांवर निस्सीम भक्ति जडली आहे; अन् त्याच्या प्रत्येक कृत्यांत तो त्याला मदत करीत आहे. प्रत्येकाला अरुणविषयीं अभिमान वाटे, कळकळ वाटे, अन् आदरमिश्रित आश्चर्यही पण वाटे. तो जिथें जाई तिथें त्याच्यावर स्तुति-सुमनांचाच वर्षाव होई. पण त्यामुळें हुरळून जाणाऱ्यांपैकीं तो नव्हता. कांहींशा बेफिकिरीनेंच तो स्तुतीकडे पाही. त्याच्या प्रत्येक कृतींतून, प्रत्येक

हालचालींतून एकच सूर निघे, अन् तो म्हणजे अशक्याच्या नादीं लागणें. अशक्य शक्य करून दाखवावें या एकाच ध्येयावर त्याचें लक्ष केंद्रित झालें होतें.

इतरांना आणि क्षणभर स्वतःलाही अशक्य वाटणारी एकादी महत्वाची गोष्ट आपल्या हातून घडली कीं अरुण अभिमानानें उषेच्या चेहऱ्यावरचे भाव निरखी. उषा स्तिमित झाली असेल का? आपल्याविषयीं तिला वाटणाऱ्या भावनांत कांहीं बदल झाला असेल का? आपल्या बुद्धिमत्तेविषयीं वाटणारा आदर व्यक्त करण्याकरतां ती आपणाला मनमोकळेपणें कधींच क्षमा करणार नाहीं का?....

कितीतरी प्रश्न त्यावेळीं त्याच्या डोक्यांत थैमान घालीत. पण तिच्या चेहऱ्यावरचा तो बेफिकीरपणा, तिऱ्हाइताप्रमाणें आपल्या हालचालींकडे पहाण्याची वृत्ति इत्यादींकडे लक्ष गेलें कीं त्याच्या हृदयांत कालवाकालव होई. क्षणोक्षणीं वाढत जाणाऱ्या व्यापाचे असह्य दडपण शिरावर घेऊन तो पुटपुटे,

—अजून कितीतरी चढायचं आहे आपल्याला! उषेनं स्वतःच्या सुखस्वप्नांत उभवलेल्या मनोऱ्यांपेक्षांही जास्त उंच असे मनोरे आपण उभवले कीं उषा लीनतेनं अन् आदरानं आपणापुढं मान लववील! नाहींतर ती आपणाकडे ढुंकूनसुद्धां पहाणार नाहीं.

संपत्ति अन् मानमान्यता मिळविण्यांत तो विजयी ठरला होता. अन् आतां त्याचे डोळे सुखाकडे वळले होते. अजूनही आत्मविश्वासावर त्याचा भर होता. जगाचा इतिहास क्षणोक्षणीं वदलूं शकणारी प्रचंड इच्छाशक्ति हीच अशक्यही शक्य करून दाखविणारी जादूची कांडी आहे असें त्याला वाटे.

पण एकादे वेळीं त्याचें मन अत्यंत हताश झालें कीं तो बेचैन होई. आपल्या मनःस्थितीचा इतरांना थांग लागूं नये म्हणून तो स्वतःला आपल्या खोलींत कोंडून घेई. त्याच्या हृदयांत चाललेल्या परस्परविरोधी भावनांच्या तुमुल युद्धाचें प्रत्यंतर त्याचे अर्धवट उघडे डोळे, डोळ्यांभोंवतीं पसरलेलीं काळसर वलयें आणि डोळ्यांत तरळणारी तीव्र चमक यांवरूनच मिळे.

उषेला आपल्यावर प्रेम करायला भाग पाडावें ही साधी गोष्टही आपणाला अशक्य होत चालली आहे याबद्दल त्याच्या हृदयाची विलक्षण तळमळ चाले.

"दुसऱ्या एखाद्या भाग्यवंतावर तर तिचं प्रेम बसलं नसेल ना?" या विचारानें तर त्याचें डोकें भडकून जाई. असूयेनें त्याच्या हृदयाच्या चिंधड्या चिंधड्या करून टाकल्या होत्या. आपण पूर्ण स्वतंत्र आहोंत हें दाखवण्याच्या हेतूनेंसुद्धां कदाचित् ती आपल्या प्रियकराशीं प्रणयाचे खेळ खेळत नसेल कशावरून? हृदयांत केवढेंही वादळ चाललें तरी उषा बाहेरून आली कीं तो अगदीं बेफिकीर वृत्ति धारण करी. जणूं तिच्या हालचालीबद्दल आपणाला कांहींच वाटत नाहीं असेंच त्याला भासवायचें होतें.

लोकांच्या नजरेला हास्यास्पद वाटलें असतें नाहींतर अरुण स्वत: उषेला नकळत तिच्या हालचालींवर नजर ठेवण्याकरितां तिच्यामागूनही गेला असता. सहज एकदां त्याच्या डोक्यांत कल्पना येऊन गेली.

— या कामगिरीवर आपण एखाद्या माणसाची योजना केली तर....

यशोदाबाई अजूनही वाड्यांत होती. अन् दिवसेंदिवस तिचें प्रस्थ वाढतच चाललें होतें. सर निंबाळकरांना तर तिच्याशिवाय चैन पडत नसे. त्यांच्या खाण्यापिण्याची, औषधपाण्याची सारी कांहीं व्यवस्था आज कित्येक वर्षं तिच्यावरच सोंपविण्यांत आली होती. सर निंबाळकरांची मर्जी प्रसन्न राखण्यांत ती अत्यंत कुशल होती. आणि त्या घरांत ती इतका काळ टिकायला आणखीही एक कारण होतें. घरच्या कितीतरी वऱ्यावाईट गोष्टी तिला माहीत होत्या. नोकरीवरून काढून टाकलें असतें तर त्या कारस्थानी बाईनें त्या साऱ्या गोष्टी षट्कर्णी करून स्वतःचा फायदा करून घेतला असता.

राहिलेलें आयुष्य आपल्या गांवीं जाऊन सुखासमाधानानें घालवावें असें कधींकधीं यशोदाबाईला वाटे. लग्नानंतर अरुणनें कबूल केलेली रक्कम तिनें उकळलीच होती. पण घरांतलें गढूळ वातावरण पाहिल्यावर तिला वाटूं लागलें कीं, आपण थोडासा धीर धरला तर याच्यापेक्षांही कितीतरी जास्त फायदा आपणाला करून घेतां येईल.

यशोदाबाईचें आणखीही एक सुखस्वप्न होतें. गांवची आठवण काढली कीं आपल्या घरापुढें असलेल्या इनामदारांच्या टुमदार बंगल्याचें मनोहर चित्र तिच्या डोळ्यांपुढे उभें राही. आपणाला असा एखादा बंगला बांधतां आला

असता तर गांवच्या साऱ्या लोकांना आपलें श्रेष्ठत्व कळले असतें. पण तसला हवाशीर बंगला बांधायचा म्हणजे आणखी दोनतीन हजारांची सहज जरुरी लागायची. या रकमेकरतां तरी थांबलंच पाहिजे होतं!.... अरुण तिला पूर्णपणें ओळखून होता. तिच्या चर्येवर खेळणाऱ्या साधेपणाला, सात्विकतेला फसण्याइतका तो दुधखुळा खास नव्हता. उषेच्या हालचालींवर नजर ठेवायला यशोदाबाईच योग्य आहे हें त्याला सहज कळून चुकले.

यशोदाबाईला त्यानें आपल्या खोलींत बोलावून घेतलें अन् आडवळणें न घेतां अगदीं मुख्य विषयालाच हात घातला. उषेची चमत्कारिक वर्तणूक, आपली बेचैन मनःस्थिति - सारें कांहीं त्यानें तिला विस्तृतपणें सांगितलें. योग्य मोबदला देण्याची इच्छाही त्यानें व्यक्त केली. पण शक्य तितक्या लवकर त्याला तिच्याकडून उषेची प्रत्येक बारीकसारीक हालचाल कळायला पाहिजे होती.

—तुम्हांला वाटलं तरी काय? असल्या हीन गोष्टी आपण मला करायला सांगतां?—त्या विषयाचा आपणाला अत्यंत तिरस्कार आल्याचा आविर्भाव आणून यशोदाबाईनें विचारलें— आपल्या पत्नीच्या हालचालींवर लक्ष ठेवायला मला सांगतांना तुम्हीं जरा विचार करायला पाहिजे होता. माझा प्रामाणिकपणा ....

—बस्स! इथं या असल्या सोंगाची जरुरी नाहीं. एकदांचा हा व्यवहार आटोपलेला बरा! मला मुळींच वेळ नाहीं हें आपणाला दिसतच आहे. बाहेर लोक वाट पहाताहेत माझी —त्रासिकपणें अरुण म्हणाला.

पण तरीही आपल्या सदसद्विवेकबुद्धीला न पटणारें कृत्य करायला आपण मुळींच तयार नाहीं असें तिनें निक्षून सांगितलें. आतां, जर त्या गोष्टीवर एकाद्या व्यक्तीचें कल्याण अवलंबून असेल तर मात्र आपली त्याला हरकत नाहीं, असेंही तिनें बोलून दाखविलें.

—मी तरी तेंच सांगतों ना तुम्हाला – अरुण किंचित् उपहासानें म्हणाला– एक सत्कृत्यच करायची मी तुम्हांला विनंति करतों आहें.... उषेला या दिवसांत बरं वाटत नसावंसं दिसतं मला. आज कित्येक दिवस ती आपणाला होणारं दुःख इतरांना सांगायचं टाळते आहे असा मला संशय येतो. गरीब बिचारी! नेहमीं विचारी, गंभीर चेहरा! तेव्हां म्हटलं, सारं कांहीं तुम्हीच योग्य रीतीनें कराल.

—असं असलं तर त्याबद्दल तुम्ही निश्चिंत असा– हृदय उचंबळून आल्याप्रमाणें ती उद्गारली –उषेवर माझं पोटच्या लेकीप्रमाणें प्रेम आहे. तिच्या सुखाकरतां मी काय करणार नाहीं? तुम्हां दोघांच्या कल्याणाकरतां माझ्या हातून होईल तें मी करीन.

अरुणनें तिच्या श्रमाच्या मानानें मोबदला देण्याचें कबूल केलें. बाईनें आपला निरपेक्षपणा दाखविण्याची कमाल केली. पण शेवटीं मोठ्या चतुराईनें उषेच्या बऱ्यावाईट वागणुकीची पुराव्यासहित माहिती देण्याचें कबूल करून तिनें मोबदल्याची रक्कम ठरवलीच! या गोष्टींतला एक शब्दसुद्धां न फुटण्याची जबाबदारी तिच्यावर होतीच.

त्या दिवसापासून अरुण जरा निश्चिंत झाला. तीन महिने केव्हांच उलटले होते. त्या अवधींत सरकारच्या खर्चाचें अंदाजपत्रक तो तयार करीत होता. गव्हर्नरसाहेबांच्या संमतीनें मूळ घटनेंतसुद्धां कितीतरी ठिकाणीं तो बदल करणार होता. त्या कलमांतल्या फरकांबद्दल चर्चेच्या वेळीं विधिमंडळांत विरोधी पक्षाकडून जोरदार हल्ला होईल याची त्याला पुरेपूर जाणीव होती. त्याला तोंड द्यायला मुद्देसूद पुराव्यांची फार आवश्यकता होती. अन् योग्य पुरावे तयार करण्याच्या त्रासदायक अन् अत्यंत जबाबदारीच्या कामांत त्याला आपल्या खासगी जीवनाचा बऱ्याच अंशीं विसर पडला होता.

यशोदाबाईशीं गांठ पडली म्हणजे त्याची आठवण जागृत होई, अन् तो उत्सुकतेनें प्रश्न करी,

—कांहीं कळलं का? उषा कुणाला भेटायला गेली होती? कुठं जास्त वेळ थांबली?

बाई बारीकसारीक माहिती पुरवी. पण अजूनपर्यंत महत्वाची अशी कोणतीच बातमी ती देऊं शकली नव्हती. आपणाला आलेला संशय खोटा ठरतो आहेसं पाहून अरुणला क्षणभर आनंद होई. पण डोळे किंचित् तिरपे करून बाई मिस्किलपणें म्हणे,

—आणखी थोडे दिवस थांबा. मला खात्री आहे कीं आपणाला हवी ती माहिती मी थोड्याच दिवसांत पुरवूं शकेन.

बाईनें अनेक गोष्टींचा बारकाईनें विचार केला होता. अरुणच्या आश्वासनाबरोबर तिचा लोभही वाढतच होता. नुसतं टुमदार घर बांधून उपयोग काय? आसपासची जमीन आपली असली तरच त्याला शोभा यायची! अन् ती विकत घ्यायची म्हणजे अरुणनें कबूल केलेल्या रकमेशिवाय आणखी हजार-बाराशें रुपये आवश्यक होते. अरुणने आपल्यावर पूर्ण भरंवसा ठेवला आहे हें खरं, पण अरुणचें रहस्य उषेच्या कानावर घालून तिच्याकडून दुप्पट रक्कम उपटावी, असा विचार पहिल्याप्रथम त्या थेरडीच्या मनांत आल्याशिवाय राहिला नाहीं. त्याप्रमाणें वागावयाचें धाडस मात्र तिनें केलें नाहीं. कारण उषेला ती पूर्णपणें ओळखून होती. कदाचित्, अगदीं पहिल्या शब्दाबरोबर तिनें तिला घराबाहेर काढायला कमी केलें नसते.

खरं म्हणजे, अरुणनें तिच्यावर ती कामगिरी सोंपविण्यापूर्वीच बाईची उषेच्या प्रत्येक हालचालीवर नजर होती. धन्यांच्या गुणावगुणांवर कित्येक वेळां नोकरांचें नशीब अवलंबून असतें म्हणतात ना? पण उषेचें नैतिक आचरण इतकें सोज्वल, इतकें पवित्र होतें कीं, इथें आपलें कांहींच फावणार नाहीं अशी तिची खात्री पटली होती. कधींकाळीं उषेचें पाऊल वांकडें पडलें होतें अशी कल्पनासुद्धां करणें वेडेपणाचें होईल इतकी उषा चांगली वागत होती. पुरुषजातीबद्दल मात्र तिला विलक्षण तिटकारा वाटत असे. केवळ एका पुरुषाच्या पापवासनेमुळें आपल्या जीवनाच्या धाग्यांचा कसा गुंतावळा झाला, जीवनांतल्या आनंदाला आपण कशी पारखी झालें इत्यादि विचार तिला कधींकधीं क्षुब्ध करीत.

आणि अशा स्थितींत यशोदाबाईनें बक्षिसाची आशा धरणें म्हणजे विचित्रच! बाईला तें ठाऊक नव्हतें अशांतली गोष्ट नव्हती. पण ती मोठी आशावादी होती!

अन् एक दिवस सहज जयंतशीं गांठ पडतांच तिला केवढातरी आनंद झाला. मोठ्या प्रेमळपणें अन् उत्सुकतेनें त्यानें बाईशीं उषेची चौकशी केली. जयंतला उषेबद्दल अजूनही किती जबरदस्त आकर्षण वाटतें आहे, तिच्याशीं घालविलेल्या क्षणांच्या स्मृति त्याला किती गोड अन् उन्मादक वाटतात हें नज-

रेच्या एका फेकीबरोबर बाईनें ताडले. अन् त्या क्षणापासून आपल्या कारस्थानाला वेगळेंच वळण देण्याची तिनें खूणगांठ बांधली. पति आणि पत्नी या दोघांचाही उपयोग करून एका धोंड्यानें दोन पक्षी मारायचे होते तिला.

असली सुवर्णसंधि सांपडणें मुष्कीलच होतें! उषेच्या उन्मादक सहवासाच्या एका क्षणासाठीं आपली सारी संपत्ति वेंचण्याची जयंतची तयारी.... जयंतनें हळूहळू यशोदाबाईचा अंदाज घ्यायला सुरवात केली, कित्येकदां बाईची भेट घेतली, मोठमोठ्या रकमांचें आमिष लावलें, उषेवर आपलें निरतिशय प्रेम असल्याचे नाटक केले, तिची प्राप्ति करून द्यायचे आश्वासन जर बाईने दिलें नाहीं तर आपण जिवाचें बरेंवाईटसुद्धां करून घेऊं अशी प्रेमळ धमकी दिली, आपलें काम केले तर आपण जन्मभर तिचे उपकार विसरणार नाहीं असेंसुद्धां तिला सांगितलें. पण आठ दिवसपर्यंत बाईनें ओढूनताणून चंद्रबळ आणले. आपण आपल्या धन्याशीं कधींच बेइमान होणार नाहीं असें तिनें जोरांत सांगितले; अन् शेवटीं तार चांगलीच ताणली आहे हें पाहून तिने जयंतच्या विनंतीला होकार दिला. एके रात्रीं जयंताला उषेच्या खोलींत ती लपवून ठेवणार होती. यापेक्षां आपण जास्त कांहींच करूं शकत नाहीं असें मात्र तिनें निरुपायानें सांगितलें.

दुसऱ्या दिवशीं सकाळींच तिनें अरुणची गांठ घेतली.

— कळलं का कांहीं? — तिच्या चर्येवरची विजयी छटा पाहून त्यानें उदासीनपणें तिला विचारलें. उषा निरपराधी आहे असें त्याला कळतें तर तो अत्यंत आनंदित झाला असता.

बाईनें बारीकसारीक गोष्टी सांगण्यांत वेळ न दवडतां मुख्य मुद्द्यालाच हात घातला. उषेचा कुणीतरी प्रियकर आहे खास! अन् इतकेंच नव्हे तर ती नेहमीं त्याची गुप्तपणें भेट घेते.

—- खरं? पण कोण तो चांडाळ? — उत्सुकतेनें अन् त्वेषानें त्यानें विचारलें.

— मला माहीत नाहीं! ती माहिती मी तुम्हांला उद्यां पुरवूं शकेन. पण एक महत्वाची गोष्ट तुम्हांला सांगायची राहिलीय....

— काय ?

— बहुतेक आज रात्रौ उषा त्याची भेट घेईल. अन् ती स्वतःच्या खोलींत ....

विजेचा धक्का बसल्याप्रमाणें तो चपापून मागे सरला. क्षणार्धात कितीतरी विचार त्याच्या डोक्यांत चमकून गेले. बाईकडे पहात मोठ्या कष्टानें तो म्हणाला,

— ठीक ! अत्यंत आभारी आहें मी तुमचा.

अरुणनें तिला निघून जायला सांगितलें. शक्य तों आपल्या मनःस्थितीचा तिला थांग लागू नये असा त्याचा हेतु होता. पण बाईच्या तें पथ्यावरच पडलें. वरील गोष्ट सांगितल्यावर ती सिद्ध करून द्यायला कित्येक पुरावे लागतील अशी तिची कल्पना होती. आपण गोंधळून जाऊं नये म्हणून तिनें त्याच्या प्रश्नांना योग्य उत्तरें तयार करून आणलीं होतीं ही गोष्ट वेगळी ! चेहऱ्यावर शक्य तितका गांभीर्याचा आव आणून ती बाहेर निघून गेली.

अरुणनें क्षणभर खिडकीबाहेर पाहिलें अन् तो उठून उभा राहिला.

— आज रात्रौ .... अन् तिच्या खोलींत .... — नकळत त्याच्या तोंडून उद्गार बाहेर पडले. त्याचें डोकें अगदीं भडकून गेलें होतें. कपाळावरून हात फिरवीत तो धुंद नजरेनें समोर पहात होता. ज्या घरांत पति वास्तव्य करतो आहे त्याच घराच्या एका भागांत पत्नीनें आपल्या प्रियकराची भेट घेणें म्हणजे निर्लज्जपणाची, हीनपणाची कमालच नव्हे तर काय ? आपोआप त्याच्या हाताच्या मुठी वळल्या, काळीज धडधडूं लागलें. सुडाच्या भावनेनें त्याच्या मनःस्थितींत केवढीतरी क्रांति करून टाकली होती ....

पण सुरू केलेलें काम आजच्या आज संपणें जरूर होतें. तीन वेळां तो निश्चयानें कामाला बसला अन् तितक्याच वेळां उसळीसरशीं उठून येरझारा घालूं लागला. कोणती तरी अज्ञात शक्ति त्याला पुढेंपुढें ढकलीत होती, सूड घेण्याला प्रवृत्त करीत होती, उषेच्या साऱ्या पापकृत्यांबद्दल जाब विचारावयाला सुचवीत होती.

त्या रात्रीं त्या उभयतांचा खून करण्याची भेसूर कल्पना त्याच्या मनांत चमकून गेली. मोठ्या कष्टानें त्यानें आपल्या क्षुब्ध मनोवृत्तींवर ताबा ठेवला. उचंबळल्या मनोवृत्तींवर मिळविलेला तो विजय खरोखर विस्मयकारक होता.

संध्याकाळीं त्यानें गव्हर्नरसाहेब व मुख्य मंत्री यांची भेट घेऊन अंदाजपत्रकावर चर्चा केली. कांहीं कलमांना त्यांचा विरोध होता. पण त्यानें अगदीं मुद्देसूदपणें त्यांना सारें कांहीं पटवून दिलें. दुसऱ्या दिवशीं विधिमंडळांत अंदाजपत्रकावर चर्चा होणें जरूर असल्यामुळें आजच्या आज तें तयार करण्याची मात्र त्यांनीं त्याला सूचना दिली.

—रात्रीचा दिवस करीन मी. पण पत्रक उद्यां चर्चेला येईल खास !— आणि घरीं परततांना अरुण स्वतःशींच पुटपुटला,

—मध्यरात्रीं त्यांचा निकाल लावलाच पाहिजे. त्यानंतर सूर्योदयापर्यंत खपून पत्रक तयार करतां येईल.

अंदाजपत्रकाविषयीं जी कांहीं थोडीबहुत माहिती बाहेर फुटली होती तीवरून चोहोंकडे खळबळ उडून गेली होती. जेवणाच्या वेळीं सर निंबाळकरहो त्याच्याशीं त्याचसंबंधीं चर्चा करीत होते. बिलांतल्या आर्थिक बाबींना सरसाहेबांचा जोरदार विरोध होता. बिलाची घटना मुत्सद्दीपणाची होती याबद्दल दुमत नव्हतें. पण सध्याच्या परिस्थितींत त्या गोष्टींचा कितपत उपयोग होईल याची मात्र त्यांना शंका वाटत होती. अरुण शांतपणें त्यांच्या शंका खोडून काढीत आपला दृष्टिकोन साधार सिद्ध करून देत होता.

आपल्यावर स्थिरावलेली उषेची नजर पाहून एकदोन वेळां तो चपापला. आश्चर्यमिश्रित कुतूहलही वाटलें त्याला ! मागेंसुद्धां अधूनमधून ती त्याच्याकडे अशाच चमत्कारिक नजरेनें पाही. आपल्या हृदयाचा ठाव घ्यायच्या हेतूनें तर ती आपल्याकडे पहात नसेल ना ? आपल्या नाजूक रहस्याचे धागेदोरे दुसऱ्यांना कळले कीं काय, या शंकेनें तर ती आपणाला निरखीत नसेल ना ? शक्य तितक्या निर्विकारपणें तो सभोंवतालीं पहात होता. कितीतरी वेळ तो बोलत राहिला. जणू अमोघ वक्तृत्वाचा अखंड प्रवाह ! आपल्या जांवयाच्या बुद्धिमत्तेपुढें सर निंबाळकरांचा विरोध पूर्णपणें मावळला. अजूनही उषा

त्याच्याकडे आस्थापूर्वक पहात होती. एका अननुभूत भावनेचें तेज क्षणभर तिच्या नेत्रांत चमकलें. पण दुसऱ्याच क्षणीं गांभीर्याच्या पडद्याआड तें लपून गेलें.

मध्यरात्रीपर्यंत त्याचें काम चाललें होतें. तें अंदाजपत्रक म्हणजे आर्थिक घडामोडींचें एक यंत्रच! त्याचा प्रत्येक खिळा, प्रत्येक भाग व्यवस्थितपणें बसवतांना अरुणला कितीतरी अडचणींना तोंड द्यावें लागलें होतें. घड्याळांत बाराचे ठोके पडले अन् नकळत तो उभा राहिला. जणू कुणाच्या तरी अदृश्य हातांनीं त्याला उठवलें होतें.

वाड्यांत गंभीर शांतता पसरली होती. आपल्या निश्चयाच्या आठवणीनें अरुणला मोठेंसें समाधान वाटलें नाहीं. मघाशीं ठरविलेला बेत आपण विसरलों तरच चांगलं झालं असतं असेंच क्षणभर त्याला वाटलें. उदासवाण्या चेहऱ्यानें तो बराच वेळ खोलींत येरझारा घालीत होता. विचारांनीं त्याचें डोकें अगदीं सुन्न होऊन गेलें होतें.

घड्याळांत एक ठोका पडला आणि अरुण भानावर आला. आपण फुकट इतका वेळ दवडला असेंच त्याला वाटलें. सुडाच्या कल्पनेनें त्याचा चेहरा लालबुंद होऊन गेला अन् आवेशभरानें तो आपल्या पत्नीच्या खोलीकडे वळला.

त्या रात्रीं उषेनें आपल्या तैनातींतल्या दासीला जरा लवकर रजा दिली होती. एकांत हवा होता तिला! आपल्या झोंपण्याच्या खोलीबाहेरच्या लहानग्या व्हरांड्यांतल्या सोफ्यावर ती मध्यरात्रीपर्यंत एक पुस्तक वाचीत पडली होती. अधूनमधून हातांतलं पुस्तक ती बाजूला करी. हात कवळले जात आणि दृष्टि दूर कुठें तरी लागे. तिच्या विचारसृष्टींत केवढें तरी वादळ चाललें होतें. नेहमीं चेहऱ्यावर पसरलेल्या तिरसटपणाची जागा आज सुखाशेनें घेतली होती. एकादेवेळीं तिच्या ओठांतून स्मितही प्रकट होई. जणू एकादें गोड सुख-स्वप्न नजरेपुढें आणण्याचा ती प्रयत्न करीत होती अन् हेतु साध्य झाला कीं आनंदित होत होती.

दचकूनच ती उठून उभी राहिली. दारावर कुणींतरी थाप मारली होती.

— कोण आहे? — किंचित् रागीटपणेंच तिनें विचारिलें.

— मी. जरा दार उघड पाहूं. — अरुण उत्तरला.

उत्सुकतेच्या भरांत तिनें मंत्रमुग्धाप्रमाणें दार उघडलें. अरुणच्या चेहऱ्यावर धुंदी पसरली होती. आंत शिरतांना त्याचा झोंक जात होता. त्याच्या मनावर त्वेषाचा पूर्ण ताबा बसला होता. अशा मन:स्थितींत अरुणला पाहून ती क्षणभर कावरीबावरी झाली. त्याची ती केविलवाणी स्थिति पाहून तिला त्याचा कळवळाही आला.

दोन तास झाले, आपण सांगितलेला माणूस उषेच्या खोलींत आहे, असें यशोदाबाईनें अरुणच्या कानांत सांगितल्याबरोबर ओढूनताणून आणलेली त्याची शांत वृत्ति ढळल्याशिवाय राहिली नाहीं. आपण जिना चढून वर केव्हां अन् कसे आलों हेंही त्याला कळलें नाहीं.

— उषा, तुझ्या खोलींत एक माणूस दडून राहिला आहे — तो गर्जून म्हणाला.

उषेनें ताबडतोब जबाब दिला नाहीं. त्या अनपेक्षित आरोपाची तिला कल्पनाही नव्हती. पण सारें कांहीं चटकन् तिच्या ध्यानीं आलें.

— वेड तर लागलं नाहीं तुम्हांला ? — उषेच्या त्या उद्गारांकडे दुर्लक्ष करून अरुण खोलीच्या दारापर्यंत गेला. तो आतां आंत शिरणार इतक्यांत ती दार अडवून उभी राहिली आणि आवेशभरानें म्हणाली,

— माझ्या अधिकारांत मी मला हवं तें करीन. समजलं ?.... एक पाऊलसुद्धां पुढें टाकायला तुम्हांला माझी मनाई आहे. तुम्हांला आंत जातां येणार नाहीं. मागं फिरा.....

मान ताठ करून ती धैर्यानें बोलत होती. एक क्षण दोघेंही एकमेकांकडे स्तब्धपणें, मुळींसुद्धां हालचाल न करतां, जिवावर उदार झालेल्या लढवय्यांप्रमाणें पहातच राहिलीं. त्वेषामुळें अरुणची सारासार विवेकबुद्धीही ताळ्यावर राहिली नव्हती. दांडगाईचासुद्धां अवलंब करून दार उघडण्याची त्याची तयारी झाली होती.

— उषा, बाजूला हो, आज मी तुझी गय करणार नाहीं — घोगऱ्या आवाजांत तो म्हणाला — तुझी पर्वा न करतां आंत जायला मी समर्थ आहें ....

— अशक्य ! तुम्हांला आंत जातां येणार नाहीं. माझी इच्छा तुम्हांला मानावीच लागेल ....

— पण या खोलींत एक पुरुष आहे ! .... — अरुण बेभानपणें ओरडला.

उषा चकार शब्दही बोलली नाहीं. नुसते उपहासानें तिनें खांदे उडविले. पण आंत शिरण्याकरतां अरुणनें पाऊल उचललेलें पाहून ती तिरस्कारानें म्हणाली,

— कबूल ! या खोलींत एक पुरुष आहे ही गोष्टसुद्धां एकवेळ खरी समजूं. पण त्याच्याशीं तुमचा काय संबंध ? मी स्वतंत्र आहें हें तुम्ही विसरतां ....

निर्दयपणें तिनें उडविलेले ते कोरडे असह्य होऊन तो मागें फिरला. एक थंड प्रवाह आपल्या नमानसांतून वाहतो आहे असें त्याला वाटलें. खरंच, उषा स्वतःच्या इच्छेनुसार वागायला मुखत्यार होती. त्या रहस्यपूर्ण नाटकांत त्याच्या पत्नीचें पात्र महत्वाचें होतें. आणि तो स्वतः एक साधासुधा विदूषक बनला होता. करारांतल्या साऱ्या अटी पाळणें त्याचें कर्तव्य होतें. पण असूया त्याला चैन पडूं देत नव्हती.

बजेटाचं काम करीत आपण खोलींत बसतों तर ? अरुणचा चेहरा फिका पडला. खिन्नपणें त्यानें आपली नजर खालीं वळवली. अन् तो गुदमरलेल्या आवाजांत पुटपुटला,

— खरं ! चुकलों मी उषा. क्षमा कर मला.

त्याची बदललेली मनःस्थिति पाहून उषेला मनापासून वाईट वाटलें. आपल्या मानी स्वभावाचाही तिला थोडासा राग आला. दरवाजा मोकळा करून ती [illegible]ऱ्या स्वरांत म्हणाली,

— पहायचंय ना आंत. चला.

स्वतः तिनेंच टेबलावरचा दिवा हातांत घेतला अन् ती प्रथम आंत शिरली. अरुणचा गोंधळ उडाला. हा प्रकार आहे तरी काय ? आपण स्वप्नांत

तर नाहीं ना, असासुद्धां त्याला संशय आला. अजूनही तो उंबरठ्यावरच स्तब्धपणें उभा होता. आपण आंत यायचं मुळींच कारण नाहीं, आपणाला कांहींच पहायचं नाहीं असें त्यानें खुणेनेंच सांगितलें. पण त्यानें आंत येऊन शंकानिरसन करून घ्यावें म्हणून उषाच हट्ट धरून बसली होती.

उषा पलंगाजवळ आली आणि दिव्याच्या प्रकाशांत तिनें खालीं पाहिलें; अनपेक्षितपणें तिथें जयंताला पहातांच ती केवढ्यानें तरी ओरडली,

— खरं. तुम्ही म्हणालां तेंच खरं ... तुम्ही म्हणतां तो माणूस इथं आहे .... पण हें कुभांड आहे. माझ्या स्वप्नांतसुद्धां ही गोष्ट नव्हती .... अगदीं गळ्याशपथ .... यांतलं मला कांहींच माहीत नाहीं ....

मोठ्या मुष्किलीनें तिनें आपली मनःस्थिति ताळ्यावर आणली. निरपराधीपणा शाबीत करण्याचा जो थोडासा प्रयत्न केला होता त्याबद्दल स्वतःला थोडासा दोषही दिला. शांतपणें ती इतकेंच पुटपुटली,

— तुमचंच खरं ! ....

जयंतची स्थिति मात्र अगदीं चमत्कारिक झाली होती. वेड्याप्रमाणें तो इकडेतिकडे पहात होता. त्याच्या कृत्याचें पारितोषिक द्यायला जर अरुण उद्युक्त झाला असता तर त्याला थोडेंसें मोकळें वाटलें असतें. पण अरुण एक शब्दही बोलला नाहीं. त्याच्या चेहऱ्यावरचा फिक्कटपणा कांहींसा गडद झाला इतकेंच ! .... जयंतच्या चेहऱ्यावर लागलेली नजर त्यानें क्षणभर उषेवर स्थिर केली. अगदीं बुचकळ्यांत पडला होता अरुण ! तें न उलगडणारें कोडें म्हणजे एक चक्रव्यूहच वाटला त्याला. किंचित् मान लववून तो पुटपुटला,

— माझीच चूक झाली. तूं स्वतंत्र आहेस !....

गंभीरपणें पावलें टाकीत तो निघून गेला. परततांना मात्र त्याला वाटलें, आपण एक चैतन्य नसलेला हाडामांसाचा पुतळाच; मनाला धक्का बसून तें बधिर झालें आहे. देहाला चेतना देण्याची शक्ति त्याच्यांत राहिलेली नाहीं. आपल्या खोलींत पाय ठेवतांच त्यानें टेबलाच्या खणांतून एक रिव्हॉल्व्हर काढलें आणि कांहीं वेळ अगदीं बारकाईनें त्याचें निरीक्षण केलें.

—झालं! आटोपलं सारं.... नुसतं मरायचं तेवढं राह्यलं–निश्चयी स्वरांत तो पुटपुटला.

दिव्याचा प्रकाश मंद झाला होता. दिवा जरा मोठा करून तो टेबला-जवळ बसला आणि जणू काय कांहींच झालें नाहीं अशा वृत्तीनें त्यानें अंदाज-पत्रकाचें काम पुढें चालविलें. चोहोंकडे गंभीर शांतता पसरली होती.

जयंताला घालवून दिल्यावर उषा चोरपावलांनीं जिना उतरली आणि दाराच्या फटींतून तिनें आंतला कानोसा घेतला. लिहितांना होणारा पेनाचा आवाज तिला स्पष्ट ऐकूं येत होता. फटींतून किलकिल्या डोळयांनीं तिनें आंत पाहिलें. अरुण शांतपणें लिहीत होता. त्याच्या चेहऱ्यावर समाधानाचें हास्य आणि हातीं घेतलेलें काम पूर्ण होत असल्याचा आनंद विलसत होता.... टेबला-वरच्या रिव्हॉल्व्हरवर किरण पडल्यामुळें तें चकाकत होतें. उषा तें दृश्य पाहून स्तंभित झाली.

— ५ —

वाड्यापुढल्या बागेलगतची ती चाळ अरुणनें आपल्या सासऱ्याकडून विकत घेतली होती. चाळींतली ती शेवटच्या मजल्यावरची खोली मात्र त्यानें भाड्यानें दिली नव्हती. त्याच्या जीवनांतल्या कित्येक महत्वाच्या घडामोडींशीं ती निगडित झाली होती. मुंबईत प्रवेश केल्यावर पक्के दोन महिने तो दुर्दैवाशीं अन् गरिबीशीं तिथेंच झगडत होता. वैभवाची प्राप्ति झाल्यावरही तो कित्येक वेळां तिथेंच तासचे तास येऊन बसत असे. तिथेंच त्याच्या हृदयाला असह्य यातना झाल्या होत्या. अन् तिथेंच त्यानें परिस्थितीवर विजय मिळविला होता. एखाद्या बिकट प्रश्नानें त्याचें डोकें भणाणून गेलें, एखादें भयंकर संकट आ वासून पुढें ठाकलें कीं तो त्या चार भिंतींआड बसून विचार करी. कित्येक साहसी योजना त्यानें त्या कोंदट जागेंत बसून आंखल्या होत्या. तिथें बसला कीं त्याच्या महत्वाकांक्षा जागृत होत. मग आत्महत्या करायला उद्युक्त झाल्यावर त्यानें तीच जागा पसंत केली तर नवल कसलें ?

सकाळचे आठ वाजले, अन् अरुणनें आपलें काम संपविलें. श्रमांच्या अतिरेकानें अगदीं गळून गेल्यासारखें होईल म्हणून त्यानें आंघोळही केली. आपल्या बहुतेक कारकुनांना बोलावून घेऊन त्यानें काम समजावून दिलें. आपला प्रायव्हेट सेक्रेटरी आल्यावर त्यानें बराच वेळ त्याच्याशीं अंदाजपत्रकावर चर्चा केली. अन् ते त्याच्या हवालीं करून गव्हर्नरसाहेबांच्या मुलाखतीला पाठविलें. गव्हर्नरांनीं नवीन शंका काढल्यास त्यांचें कसें समाधान करावयाचें त्याचाही त्यानें खुलासा केला. एवढें झाल्यावर त्यानें एक समाधानाचा निःश्वास सोडला. आपण शिरावर घेतलेली जबाबदारी एकदांची पार पडल्याबद्दल त्याला

अत्यानंद झाला होता. सारें कांहीं व्यवस्थितपणें अगदीं अरुणच्या इच्छेनुसार घडलें होतें. जबाबदारीच्या भीतीनें तो जगांतून नाहींसा होत नव्हता. आतां तो स्वतंत्र होता. भित्रा म्हणून लोकांना त्याच्याकडे बोट दाखवितां आलें नसतें.

नऊ वाजले. योग्य वेळ येऊन ठेपली हे पाहून त्यानें खिशांत रिव्हॉल्व्हर घेतलें अन् निश्चितपणें दाराबाहेर पाऊल टाकलें. पण बाहेर आणखी एक दुःखद प्रसंग त्याची वाट पहात होता. यशोदाबाईनें त्याला दारांत गांठलें आणि संभावितपणें कबूल केलेली रक्कम ताब्यांत घेतली. अगदीं मनाविरुद्ध का होईना, पण तिला कोणत्याच गोष्टीचा सुगावा लागूं नये म्हणून तो तिच्याशीं कांहीं वेळ जिव्हाळ्याचा आव आणून बोलत राहिला. एकाद्या परीक्षेंतून उत्तीर्ण होणाऱ्या आपल्या मुलाशीं वागणाऱ्या आईप्रमाणें ती मानभावी बाई त्याच्याशीं बोलत होती. आत्महत्या करण्याचा अरुणचा विचारही कदाचित् बदलणें शक्य होतें. पण यशोदाबाईच्या त्या भेटीनें त्याचें मन अधिकच विटलें. एक प्रकारच्या धुंदींतच तो भराभर मजले चढून वर गेला अन् त्या आपल्या अत्यंत आवडत्या खोलींत शिरला. गडबडींत किल्ली दारासच राहून गेली याच्याकडेही त्याचें लक्ष नव्हतें.

त्या खोलींत कसलाच फरक घडून आला नव्हता. तोच काळवंडलेला रंग, वळकटी, टेबल आणि खुर्ची. सारें कांहीं अगदीं जागच्या जागीं राहून त्याची पूर्वीची परिस्थिति उघड करीत होतें. आपल्या दुःखद गतायुष्याची आठवण करून देणाऱ्या त्या कोंदट वातावरणांत त्यानें थोडा वेळ श्वासोच्छ्वास केला. खिडकींत उभा राहून त्याच्या चिरपरिचित देखाव्याकडे त्यानें नजर फेंकली. तो अफाट सागर, चौपाटी, प्रचंड इमारती, अधूनमधून डोकावणारीं हिरवींगार झाडें, सोनापूर, सारें कांहीं सूर्यकिरणांत चकाकत होतें.

आतां त्याला कसलीच घाई नव्हती. हातालगतच रिव्हॉल्व्हर टाकून देऊन तो विचार करीत पडला. स्वस्थपणें आपणाला आत्महत्या करून घेतां येईल असा त्याला दृढविश्वास वाटत होता.

आठदहा वर्षांचा दीर्घ काळ लोटूनही 'ये रे माझ्या मागल्या' असंच झालं नव्हतं का त्याच्या बाबतींत ? कांहीं वर्षांपूर्वी आत्महत्या करण्याच्या हेतूनें तो तिथेंच उभा होता. पण त्यावेळीं त्याच्याजवळ एक फुटकी कवडीसुद्धां नव्हती. आत्महत्या करायला रिव्हॉल्व्हर तरी कुठून असणार त्यावेळीं त्याच्यापाशीं ? रस्त्यावरच्या फरशीवर उडी घेऊन कपाळमोक्ष करणं इतकंच त्याच्या हातीं होतं. साधन कुठलंही का असेना ! शेवट मात्र एकच होता. आत्महत्या ! मृत्यु !.... मृत्यूशिवाय जगांतली प्रत्येक गोष्ट चंचल आहे असेंच त्याचें मत बनलें होतें. अरुणचा पूर्ण पराजय झाला होता ! सुखस्वप्नं फसवीं, चंचल ठरलीं होतीं ! आपण उगीचच आपलं आयुष्य दहा वर्षांनीं वाढवलं. त्याच वेळीं जर आत्महत्या केली असती तर त्यानंतरचे कटु अनुभव आपल्याला सहन करावे लागले नसते. वैभव आणि मानमान्यता मिळविण्याचें आपलें ध्येय किती बालिश होतें ! फुकट आपण आपली शक्ति, बुद्धिमत्ता खर्च केली ! इच्छाशक्तीच्या जोरावर आपण विजयी होऊं पहात होतों. पण दैवानें तिच्यावर मात केली. आपण उषेवर वेड्याप्रमाणें प्रेम केलं आणि सुखस्वप्नांचे सारे मनोरे एकाद्या मुलाच्या फुंकरीसरशीं उध्वस्त होणारे पत्त्यांचे बंगले ठरले.

किती क्षुद्र हें जीवन ! कर्तुमकर्तुम् शक्तीच्या श्रेष्ठ माणसांनाही इथं रस्त्यावरच्या कुत्र्याच्या मोलाचं मरण ठरलेलं. किती दुर्दैवाची गोष्ट ही !

अरुणनें टेबलावरचें रिव्हॉल्व्हर उचललें आणि त्यावरून खिन्नपणें हात फिरविला. त्या शेवटच्या क्षणीं एका कल्पनेनें त्याला घेरलें अन् त्यामुळें त्याला उदासवाणें वाटल्याशिवाय राहिलें नाहीं.

— खरंच ! उषेला आपल्या व्यक्तिमत्तेची ओळख पटली असती तर ! ज्या क्षणीं 'मी तुमची आहें' असे उद्गार उषेच्या तोंडून निघाले असते त्या क्षणीं इकडची पृथ्वी तिकडे करण्याची शक्ति त्याच्या अंगांत आली असती.

विचारांनीं डोकें भडकून गेल्यावर तर त्याला स्वतःच्या बलाचाही तिटकारा आला. आपल्या अंगच्या गुणांच्या जोरावर सारं कांहीं जिंकण्याची त्याची महत्वाकांक्षा ! पण एका क्षुल्लक स्त्रीचा हृदयपालटसुद्धां तो करूं शकला नव्हता.

रिव्हॉल्व्हर उचलून त्यानें समोर नजर फेकली. सकाळ अगदीं सुंदर दिसत होती. खिडकीवाटे येणारे सूर्यकिरण खोलींत चैतन्य, जोम भरून टाकीत होते. सारी मोहमय मुंबापुरी आपल्या व्यवसायांत गर्क होऊन गेली होती.

रिव्हॉल्व्हरची नळी अरुणनें उजव्या कानशिलाशीं धरली. त्याचें हृदय धडधडत होतें, हात कंप पावत होते. चेहऱ्यावर पांढुरकी छटा पसरत होती ....

डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच दार उघडलें गेलें. उषेनें ताडकन् उडी घेऊन रिव्हॉल्व्हर बाजूला केलें. क्षणार्धांत गोळी वरच्या छतांतून आरपार गेली.

उषेला गहिंवरून आलें होतें. तिच्या तोंडांतून शब्दही फुटत नव्हता. अगदीं गोंधळून गेली होती ती. पण मनाचा धीर करून, आपल्या पतीवर निस्सीम प्रेम करणाऱ्या पत्नीप्रमाणें ती गद्गदलेल्या स्वरांत पुटपुटली,

— मला क्षमा करा. मी तुमची आहें ....

त्या एकाच वाक्याची तो आज इतका काळ अपेक्षा करीत होता. आत्महत्येच्या विचारांपासून त्याला परावृत्त करूं शकणारें तें एकच वाक्य होतें.

हुंदके देत उषेनें त्याच्या गळ्याभोंवतीं आपल्या हाताचा विळखा घातला आणि आपलें हृदय उघडें केलें.

— माझ्या खोलींत आढळलेल्या त्या माणसाचा मीं नेहमीं द्वेष केला. माझ्या वाईटावर टपून असलेल्या कुणींतरी दुष्टानं त्याला माझ्या खोलींत लपविलं असलं पाहिजे. माझ्यावर दया करा. मी तुमचीच आहें. आज दहा वर्षं मी तुमच्यावर प्रेम करतें आहें. तुमच्याशिवाय दुसऱ्या कुणाविषयींच मला प्रेम वाटलं नाहीं. तुम्ही समर्थ आहांत. मी तुमची गुलाम आहें. तुमच्या नखाचीसुद्धां मला सर येणार नाहीं !



# चुकलेले वाटसरू

किती बावरली होती ती त्या वेळीं. चेहऱ्यावर पसरलेला तो रक्तिमा, किंचित् कांपणारे ते मोहक ओठ, गात्रागात्रांतून प्रकट होऊं पाहणाऱ्या बावरलेल्या वृत्तीवर संयम ठेवण्याकरितां चाललेला निष्फळ प्रयत्न, सभोंवार भिरभिरणारे तिचे ते तेजस्वी डोळे. सहजच तिकडे माझं लक्ष वेधलं. इतकं गोंधळून जाण्यासारखं झालं तरी काय तिला ? मी स्वतःशींच विचार करीत होतों.

क्षणभर ती थबकली. तिनं आसपास नजर फेकली. कुणी म्हटल्या कुणीच नव्हतं तिथं. आसपास भुरभुरणाऱ्या वायुलहरी, मावळतीच्या किरणांचा स्निग्धमधुर प्रकाश अन् बागेतल्या सुंदर सुंदर फुलांच्या रम्य सुगंधाच्या तालावर गात नृत्य करणारे रंगीबेरंगी पक्षी. बाकी सगळं शांत ! मी हातांतल्या पुस्तकावरून क्षणभर नजर फिरविल्यासारखं केलं आणि नंतर जरा उत्सुकतेनं आणि कुतूहलानं तिच्याकडे पाहूं लागलों. पदराच्या आभाळी रंगाच्या किनारीआडून एक टपोरा गुलाब डोकावला. बालिशपणें त्या गुलाबाचं तिनं चुंबन घेतलं आणि माझ्या बाजूनं एक धुंद कटाक्ष फेकून तिनं तो गुलाब जमिनीवर फेकला. तिच्या चेहऱ्यावर स्मित ओसंडलं, जणू तिनं आपल्या मनाशीं रंगविलेलीं सुखस्वप्नं सत्यांत उतरलीं होतीं. सोबत असलेल्या लहानग्या मुलीचा हात तिनं हातांत घेतला अन् झपाझप पावलं टाकीत ती दूर जाऊन बसली. बसल्या बसल्याच तिनं माझ्या बाजूला पाहिलं. किती उत्सुकता भरली होती त्या तेजस्वी डोळ्यांत !

दहापांच हातांच्या अंतरावर पडलेला तो मोहक गुलाब पाहून मी केवढ्यानें तरी दचकलों. नुकतंच यौवनाच्या सीमेवर पाऊल ठेवलेली बालिश

पोरगी. प्रीतीच्या नाजूक भावनांनीं तर तिचं हृदय भारलं गेलं नसेल ना ? माझ्याशीं प्रणयाचे खेळ खेळायची तर तिची इच्छा नाहीं ना ? तो गुलाब म्हणजे तिच्या कोवळ्या हृदयांत फुललेल्या प्रीतीचं प्रतीक तर नसेल ?

मन म्हणजे स्वार्थीच. अन् त्यांतल्या त्यांत माझ्यासारख्या अविवाहित तरुणाचं मन. तें किती स्वार्थी असेल ! चटकन् मला वाटलं खरंच पोरगी माझ्यावर प्रेम करते आहे. तो गोड गोंधळ, टपोरा गुलाब आणि तें मुग्ध हास्य. गोड संवेदनांनीं माझं हृदय पुलकित झालं.

हळूच बांकावरून उठलों आणि तो गुलाब उचलला. त्या नाजूक पाकळ्यांवरून हलुवारपणें बोटं फिरविलीं आणि दूर अंतरावर माझ्याकडे बुभुक्षित नजरेनं पहाणाऱ्या त्या पोरीकडे नजर फेकली. किती गोड हंसली ती ! मी अगदीं धुंद होऊन गेलों होतों. आवेगभरानं त्या गुलाबाचं चुंबन घेतलं आणि बटनहोलमध्यें तो गुलाब ठेवून दिला.

आभाळांत नुकत्याच चांदण्या चमकूं लागल्या होत्या. आकाशांतला चंदेरी प्रकाश पांढुरक्या जमिनीवरून परावर्तित होत होता. अन् त्या रम्य चांदण्यांत ताडाच्या व शिंदीच्या सावल्या खेळत होत्या.

तीं दोघंही उठलीं आणि निघून गेलीं. किती तरी वेळां तिनं मागं वळून पाहिलं. मीही तीं अदृश्य होईपर्यंत तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे डोळे लावून बसलों होतों.

इग्रजींतली घंटा 'आव्हेमारीय' गुणगुणूं लागली. ते निनाद कानावर पडतांच मी भावनातंद्रींतून खडबडून जागा झालों. बाजूला पडलेलं पुस्तक हातांत घेतलं अन् त्यावरून नजर फिरवायचा प्रयत्न केला. पण एकच ओळ मीं किती वेळां वाचली कुणाला ठाऊक ? बटनहोलमधल्या नाजूक गुलाबाचा सुवास मनाला आल्हाद देत होता. मी स्वतःशींच पुटपुटलों,

—किती गोड पोरगी ...

पण इतक्यांत हृदयाच्या खोल गाभाऱ्यांत एक ध्वनि उमटला.

—अन् शांता गोड नाहीं का ?....

मीं कावऱ्याबावऱ्या नजरेनं सभोंवार पाहिलं. शांताच्या विचारानं मीं अगदीं गांगरून गेलों. जणू शांता माझ्यासमोर उभी राहिली आहे अन् अत्यंत केविलवाण्या स्वरानें मला विचारते आहे,

—मना, मना, इतक्यांतच विसरलास मला ? ....

शांतेची ती केविलवाणी मुद्रा, ते मोजकेच हृदयभेदक शब्द ! केवढें तरी काहूर उसळलें माझ्या हृदयांत. परक्या मुलीनं टाकलेलं तें फूल आपण हातांत घेणं म्हणजे शांताच्या स्मृतीशीं विश्वासघात करण्यासारखंच नव्हतं काय ?.... माझी शांता ! कुणाला तरी तिची सर येईल का ? तें अद्वितीय सौंदर्य, ती प्रीति. तिच्या भावदर्शी डोळ्यांना किती वेडावलों होतों मी !

आणि त्याच शांताचा विसर पडावा मला ?

—नाहीं शांता, मी तुला कधीं तरी विसरूं शकेन का ?.... माझ्या हातून क्षणभर चूक घडली हें कबूल करतों मी. पण रागावूं नकोस माझ्यावर ; तुझ्या मनोहरावर दया कर. मी तरी माणूसच ना ? आपणावर दुसऱ्याचं प्रेम जडलं आहे असं पाहून ज्याला आनंद होत नाहीं तो माणूस तरी कसला ? नसानसांतून खेळणारं तरुण रक्त थोडा वेळ बंडखोर झालं. पण शांता.... यापुढें मात्र मी या भावनांवर संयम ठेवीन. पण माझ्यावर रागावूं मात्र नकोस.

पण तो सारा आभास होता. शांता कुठं होती तिथं ? तरीपण शांतेच्या कल्पनेंतल्या मूर्तीकडे पाहून केलेल्या हृदयाविष्करणानें मन थोडेंसें शांत झालें. मनाशीं निश्चय केला अन् मघांचा तो टवटवीत गुलाब चोळामोळा करून बाजूला फेकून दिला. त्या कृतीनें जणू आपण त्या बालिश पोरीच्या हृदयांत रुजत चाललेल्या प्रीतीच्या भावनांचा निर्दयपणें चुराडा करतों आहोंत असं मनाला वाटलं. अन् तिच्याविषयीं कळवळा आला.

परस्परविरोधी विचारांनीं डोकं भारून गेलं होतं. शांतेची भेट झाली त्या शेवटच्या प्रसंगाची आठवण किती ताजी होती ! ती कधीं तरी विसरणं शक्य होतं का मला ? त्या वेळीं शांता म्हणाली होती,

—मना, प्रदर्शनांत पाहिलेलं तें चित्र आठवतं का रे तुला ? ‘चुकलेले वाटसरू’. किती सुंदर होतं तें, नाहीं ? वादळाचें तें भयानक दृश्य, पाण्याच्या

खवळलेल्या पृष्ठभागावर तरंगणारे फुटलेल्या जहाजाचे अवशेष आणि एकमेकां-पासून किती तरी दूर अंतरावर फळकुटांच्या आधारावर खवळलेल्या लाटांशीं झगडणाऱ्या दोन व्यक्ति, एक पुरुष अन् एक स्त्री. चोहोंकडे पसरलेल्या भयाण अंधःकारांत आशेच्या किरणांचा शोध चालविला होता त्यांनीं.

— कळलं मला शांता सारं. आमच्यासारखेच चुकलेले वाटसरू होते ते. त्यांची नजर दीपगृह धुंडीत होती. पण वादळाचा जोर वाढला, सागर जास्त खवळला, पंचमहाभूतांनीं प्रलयकालाची आठवण करून दिली तरच आम्हांला समाधान लाभेल. नाहीं शांता ? .... मीं उत्तरलों.

— मना, मना, काय झालं रे हें ?

— शांता, जें व्हायचं तेच झालं. भावना वेडी आहे. भावनेच्या स्वप्नांत जगाच्या सत्य स्वरूपाचा विसर पडतो अन् मग पस्तावण्याची पाळी येते. कुणीं सांगितलं होतं मला तुझ्यावर प्रेम करायला ? तुझ्या घरचं वैभव पाहून माझे डोळे दिपले नव्हते. धनाची मला पर्वा नव्हती. प्रीतीला कोणतींच बंधनं अडवूं शकत नाहींत, असं वाटत नव्हतं का मला ? पण जगाच्या बाजारांत वैभवालाच भुलणारे जास्ती. तिथं गुणाला, सौंदर्याला किंमत नाहीं, शांता....

मी क्षणभर स्तब्ध राहिलों. शांता रडत होती. डोक्यांत भराभर विचार येऊन जात होते माझ्या.

मी काय कमी हुषार होतों ? शाळेच्या चिमण्या जगांत हुषारीच्या जोरावर पहिल्या नंबराचीं बक्षिसं मिळवितांना किती अभिमान वाटे मला. रेगे मास्तर लेखनकलेंतली आणि काव्यगायनांतली माझी हुषारी पाहून आपला चष्मा सांवरीत अन् डोळे किलकिले करीत म्हणत,

— किती सुंदर कविता म्हणतो पोरगा. नांव काढील पुढंमागं. पण माझं म्हाताऱ्याचं ऐकशील मनोहर ? तूं कवि मात्र होऊं नकोस. कवि हा भावनेवर जगणारा प्राणी आहे. सुखाचा संसार आणि भावनाप्रधानता यांचं कधींच पटत नाहीं. काव्याच्या नादांत गुंग होणारीं माणसं नेहमीं दुर्दैवी, दुःखी होतात, असा माझा स्वतःचा अनुभव आहे.

शाळेच्या शेजारच्या घरांत असलेले बिऱ्हाडकरू तर माझ्यावर बेहद्द खूष असत. अजून आठवते मला एक गोष्ट. जणू आजच सारं कांहीं घडतं आहे. त्या बिऱ्हाडांत एक वयस्क विधवा रहात असे. किती प्रेम होतें माझ्यावर तिचं ; माझं अन् तिचं दूरचं नातंसुद्धां नव्हतं, पण माझ्या चेहऱ्याकडे अधाशी-पणें पहात ती म्हणे,

— किती सुंदर माझा मना. दृष्ट काढली पाहिजे त्याची. नजरसुद्धां लागायची एकाद्याची.

अन् खेळांतलं माझं प्रावीण्य. किती स्तुति होत असे माझी. नेहमीं कोणतीही कला मला थोडक्याच श्रमांत अवगत होई. शाळेच्या चिमण्या जगांतलं हें सारं कौशल्य कॉलेजांत जास्तच प्रकर्षानं प्रकट झालं. पण मी श्रीमंत नव्हतों. लग्नाच्या बाजारांत मला किंमत नव्हती. गरिबांना प्रीति करण्याचा हक्क तर नसतोच. नाहीं तर माझ्यावर मनःपूर्वक प्रेम करणारी शांता दुसऱ्याची कशी झाली असती ? तिचा नवरा सुंदर होता, हुषार होता, शांताला अगदीं योग्य असा होता. शांताचं मन .... तिच्या वडिलांनीं तिच्या सुखाकरितांच सारं कांहीं केलं होतं. पण तिच्या नाजूक हृदयाची कुणीं पर्वा केली होती ?

— मना, शांतानें अश्रुक्लांत नजरेनें माझ्याकडे पाहिलें.

— काय शांता, रागावलीस माझ्यावर ?

— नाहीं मना. तुझी शांता तुझ्यावर कधीं तरी रागावेल का ? दचकूं नकोस असा. मी बोलतें तें अगदीं सत्य आहे. माझं शरीर दुसऱ्याचं झालं, पण मन ? तें तुझं आहे. अन् तें नेहमीं तुझंच राहील. कळलं मना ?

— अगदीं वेडी आहेस तूं शांता.

— हो. पण वेडीं माणसेंच निःसीम प्रेम करूं शकतात हें मात्र तूं विसरूं नकोस. पण माझं ऐकशील मना ? तूं कां रे करीत नाहींस लग्न ? कदाचित् तुला त्यामुळें आपल्या गतायुष्याचा विसरही पडेल. अन् तूं सुखीही पण होशील.

— काय शांता ? काय म्हणालीस तूं ?

— कांहीं नाहीं —- शांता गोंधळून उत्तरली.

—शांता, तूं अजून मला पुरं ओळखलं नाहींस. गोड आठवणींच्या स्मृतीवर जगण्यांतच माझ्यासारख्याला आनंद होत असतो. प्रवाहाच्या उलट दिशेनें पोहण्याचा मी प्रयत्न करीत होतों. त्यांत मी अयशस्वी झालों. पण कांहीं वेळ प्रवाह कापून गेलों याचं सुख तर लाभलं ना मला? अन् त्या सुखाच्या गोड आठवणी .... शांता, मी नेहमीं तुझाच राहीन.

अभिमानानं अन् समाधानानं शांताचे डोळे हंसले. पण त्या हास्याच्या आड दुःखाची एक सावली दिसत होती. खिन्न मनःस्थितींतच आम्हीं एक-मेकांचा निरोप घेतला.

शांता दुसऱ्याची झाली अन् मी माझ्या ओळखीच्या जगापासून दूर पळालों. स्वतःच्या गांवांत नोकरी मिळत असूनही मी दूर जातों आहें याचं लोकांना आश्चर्य वाटलें. पण माझ्या मनाचं कोडं कुणाला तरी उलगडणं शक्य होतं का? मी हसतों आहें, खेळतों आहें, आकर्षक वेषभूषा करतों आहें, अन् तोंडभर बोलतों आहें, इतरांना वाटतं किती सुखी माणूस!

पण माझं हृदय!....त्या हृदयांतून ओसंडणारे अश्रु इतरांना कसे दिसतील?

सहा वाजले अन् मी बागेंत माझ्या नेहमींच्या जागेवर जाऊन बसलों. नकळतच माझे डोळे आसपास फिरले. ती कालची पोरगी हळूहळू पावलें टाकीत येत होती. तिच्या चेहऱ्यावर विलसणारा तो उल्हास, सुंदर वेषभूषा, नेत्रांत केंद्रित झालेली सुखाशा. माझे डोळे तिच्यावर खिळल्याशिवाय राहिले नाहींत. क्षणभर भास झाला, माझी शांताच तर त्या पोरीच्या रूपांत येत नसेल?

बांकासमोर पोंचतांच कालच्याप्रमाणेंच ती थबकली. तिचा अगदीं गोंधळ उडाला. जणू ओठांच्या पाकळ्यांपर्यंत शब्द येऊन थबकत होते. पण ती त्यांना वाट मोकळी करून देऊं शकत नव्हती. पण क्षणभरच ती स्थिति कायम राहिली. दुसऱ्याच क्षणीं पातळांतून तोच हात बाहेर आला अन् एक मोहक गुलाब खालील हिरवळीवर पडला. तिच्या चेहऱ्यावर मिस्किल हास्य पसरलें. सहजच मीही हसलों.

कालच्याच जागेवर ती जाऊन बसली. क्षणभर मी भान विसरलों. वायुलहरींवर तरंगत माझं मन स्वर्गीय सुखाचा अनुभव घेत आहे असं मला वाटलं. एकाद्या मंत्रमुग्ध नागाप्रमाणें मी उठलों अन् तो गुलाब उचलला. त्याच्या लुसलुशीत पाकळ्यांवरून हळुवारपणें हात फिरविला. त्या गुलाबाचं मी चुंबन घेणार इतक्यांत चटका लागल्याप्रमाणें माझा हात मागं आला. एकदम शांताच्या आठवणीनं मला धक्का बसल्यासारखं झालं. क्षणभर मी अगदीं गोंधळून गेलों. अन् पुढं मी काय केलं तें मला समजलं नाहीं. पण विचार-तंद्रींतून जागा होऊन मी समोर पहातों तों काय! ती भावनाप्रधान पोरगी गंभीरपणें पावलं टाकीत चालली होती अन् हातरुमालानं डोळेही पुशीत असावीसं वाटलं मला.

बुटांच्या टाचांखालीं गुलाबाच्या पाकळ्या पाकळ्या झाल्या होत्या. बिचारा गुलाब निर्दयपणें चिरडला गेला होता....

माझं हृदय कळवळलं. आपण चुकलों तर नाहीं ना? असंसुद्धां वाटलं. पण क्षणभरच तें.

— माझी शांता — शांतेच्या विचारानं मन प्रसन्न झालं. थोडासा अभिमानही वाटला मला. बंडखोर भावनेवर केवढा विजय मिळविला होता मीं! शांतेला हें कळलं असतं तर? काय वाटलं असतं तिला....?

बागेंत जायचं मीं सोडून दिलं त्या दिवसापासून. गेलोंच तर अगदीं काळोख पडल्यावर – बाग अगदीं निर्जन झाली म्हणजे. चार दिवस ती पोरगी दिसली नाहीं. नेहमींप्रमाणें ती येऊनही गेली असेल.

त्या दिवशीं मात्र मी स्तंभितच झालों. नुकताच कामावरून येऊन मी खिडकींत उभा राहिलों होतों. रस्त्यावरून ती पोरगी आपल्या लहानग्या बहिणीबरोबर जात होती. उत्सुकतेनं तिनं खिडकीकडे पाहिलं. मला पाहून तिला आनंद झाला असावा. मी मात्र चटकन् बाजूला झालों. ती हिरमुसली झाली. दाराच्या फटींतून मी बाहेर पाहिलें. वळण येईपर्यंत ती मागें वळून पहात होती. गरीब बिचारी. चूक झाली का माझ्या हातून? मी तिला भुल-विण्याचा प्रयत्न तरी कधीं केला होता का? पण.... ज्योति पतंगाला बोलावते का कधीं? पतंगालाच ज्योतीशीं खेळावंसं वाटतं अन् बिचारा पतंग....!

काय होईल त्या पोरीच्या हृदयाचं ? तारुण्यांत प्रवेश करतांना हृदयावर झालेल्या भावनांचे संस्कार अमर रहातात म्हणे.... अन् तिचं कांहीं बरंवाईट झालं तर कुणाची चूक.... ?

नियमितपणें तिची माझ्या घरावरून फेरी ठरलेली. किती आकर्षण आहे त्या पोरींत ! एखाद्या वेळीं वाटतं, जावं अन् तिची समजूत करून द्यावी कीं, भावना वेडी आहे, तिच्यांत दुःखाचं बीज भरलेलें आहे, माझा नाद सोडून दे. त्या निश्चयानें मी कित्येकदां घराबाहेर पडतोंही. पण धीर होत नाहीं.

अन् कित्येकदां माझ्या भावी जीवनाविषयीं विचार करूं लागलों म्हणजे मला वाटतं, आपल्या भावी जीवनांत नुसतं अंधःकाराचं साम्राज्य पसरलेलं. तिथं प्रकाशदीप पाजळण्याचा प्रयत्न करूं का ? तिच्या प्रीतीला प्रत्युत्तर देऊं का ? आपणाला आवडलेली ती पोरगी.....

अन् शांता !....

तिच्या विचारानं सारे बेत पळून जातात अन् वाटूं लागतं, जगांत चुकलेले वाटसरूच अधिक. आणखी एका पोरीची भर पडेल त्यांत.

# वंचना

म्युनिसिपल बागेंत त्यावेळीं जमलेलीं आनंदी जोडपीं, इकडून तिकडे फुलपांखरांच्या वृत्तीनें बागडणारीं रंगीबेरंगी पोषाख केलेलीं गोरींगोमटीं मुलें, वृंदवादनाच्या मंजुळ स्वरांत आपले स्वर मिळविणारे तरुण, इतकं सारं पाहिल्यास पांच केव्हांच वाजल्याचें सहज कळून आलें असतें.

जॉर्ज आणि मी आज आमच्या एका बालमित्राचें ऑपरेशन आटोपून नुकतेच हॉस्पिटलांतून अगदीं विषण्ण मनःस्थितींत येत होतों. गरीब बिचारा आमचा मित्र! किती सशक्त अन् तेजस्वी. पण क्लोरोफॉर्मच्या पहिल्या थेंबा-बरोबरच एक भावगीत गुणगुणतांना त्याला ग्लानि आली. त्याच्यासंबंधींच आम्ही विचार करीत होतों.

—जॉर्ज!

रस्ता ओलांडून आम्ही फुटपाथवर पाय ठेवीत होतों. इतक्यांत वरील हांक कानीं पडली. आम्हीं चमकून चारी बाजूंना पाहिलें. पण हांक मारणारी व्यक्ति कांहीं दिसली नाहीं. प्रत्येकजण आपल्याच नादांत चालला होता. इत-क्यांत फिरून एकदां हांक ऐकूं आली आणि त्याबरोबरच निर्मल हास्याचा ध्वनि चोहोंकडे पसरला. हांक मारणारी व्यक्ति पहातांच जॉर्ज चकितच झाला. मोठ्या तत्परतेनें तो रस्त्याच्या कडेला उभ्या असलेल्या मोटारीच्या दिशेनें गेला. आणि कांहीं वेळानें एका तरुणीशीं संभाषण करण्यांत पूर्ण गर्क झाला.

जॉर्ज मोटारीच्या चाकावर हात ठेवून मोठ्या ऐटींत त्या युवतीशीं निःसंकोचपणें बोलत होता. ती युवती अगदीं तरुण होती. नुकतीच विशी उलटलेली. कुरळे, पिंगट केंस, जरा काळीसावळीच; पण अत्यंत मोहक,

हंसरे डोळे, आणि जिवणीची हालचाल तरी किती नाजूक! तें असामान्य सौंदर्य निरखतांना मी विस्मित झालों. कितीतरी विचार डोक्यांत येऊन गेले.

—एखाद्या कलावंताला ही रेखीव सौंदर्यदेवता चित्रफलकावर अमर करून ठेवायची संधि मिळाली असती तर?—मी स्वतःशींच पुटपुटलों.

जॉर्जच्या प्रत्येक वाक्यासरशीं तिच्या मनोहर चेहऱ्यावर बागडणाऱ्या हास्यलहरी किती रम्य होत्या! त्या हास्यलहरींत हृदयाची विशुद्धता प्रतीत होत होती.

ड्रायव्हरनें एक पुठ्ठयाची भली मोठी बॅग मोटारच्या मागच्या बाजूस आणून ठेवली अन् तो अदबीनें उभा राहिला. त्याबरोबर त्या युवतीनें जॉर्जशीं हस्तांदोलन केलें अन् म्हटलें,

—येत जा ना आमच्याकडे. तुम्ही त्यांचे मोठे जिव्हाळयाचे मित्र. तुमच्यासारख्यांशीं बोलत राहिलं म्हणजे हृदय हलकं होतं. क्षणोक्षणीं त्यांची आठवण होते. किती प्रेमळ अन् सहृदय....

मोटार झर्रकन् निघून गेली. तिच्या मागच्या बाजूस पडलेले रुपेरी किरण परावर्तित होत होते. बराच वेळ मी त्या दिशेकडे उत्कंठित नजरेनें पहात होतों.

—ती कोण तें माहीत आहे तुला?–जॉर्जनें मला विचारलें.

मीं नुसता मानेनेंच नकार दिला.

—डॉ. आलेशांद्रि दीयश्‌ची विधवा ती.

—खरं?–मी आश्चर्यानें स्तिमित झालों होतों; जॉर्जच्या एका वाक्यासरशीं माझ्या डोळ्यांपुढून कितीतरी आश्चर्यकारक घडामोडींचा चित्रपट सरकून गेला. मीं नुसता गंभीरपणें पुटपुटलों,— गरीब बिचारी!

—हो. अगदीं खरं. तिच्या जीवनाची आठवण झाली म्हणजे हृदय कसं पिळवटून जातं. वयाच्या एकुणिसाव्या वर्षांत पदार्पण करतांना कितीतरी सुखस्वप्नें हृदयाशीं बाळगून तिनें विश्वस्तपणें आपला हात आलेशांद्रीच्या हातीं दिला होता. बिचारी अवघे सहा दिवस सौभाग्यवती म्हणून जगापुढें मिरवली

अन्.... नवऱ्याच्या मृत्यूपासून ओळखतोंय मी तिला! किती सुंदर! मोहक! नजरसुद्धां बाजूला करवत नाहीं तिच्यावरनं. नवऱ्याच्या सान्निध्यांत घालविलेल्या थोडक्याच सुखाच्या क्षणांच्या आठवणींवर जगतेय ती. आलेक्सांद्रीच्या सहृदयतेबद्दल किती विश्वास वाटतोय तिला. पण....

डॉ. दीयशशीं कांहीं माझा परिचय नव्हता. एक लोकप्रिय अन् यशस्वी डॉक्टर इतकीच त्याच्याविषयींची मला माहिती. पण दोनअडीच वर्षांपूर्वी त्याच्या मृत्यूमुळें उडालेली विलक्षण खळबळ मी अजून पूर्णपणें विसरलों नव्हतों. लग्नाला कुठें अवघे सहा दिवस होताहेत तोंच घडलेला त्याचा मृत्यु—किती शोककारक घटना!

माझ्या डोळ्यांपुढें कितीतरी करुण प्रसंग घडले होते. अन् ते मीं निर्विकारपणें पाहिले होते. पण अनुभवांनीं अन् कर्तव्याच्या जाणिवेनें कठोर बनत चाललेले माझें डॉक्टराचें हृदय त्यावेळीं मात्र द्रवल्याशिवाय राहिलें नव्हतें.

—तो एकाएकीं कसा वारला ते ठाऊक आहे का तुला?- जॉर्जनें आपले करडे डोळे माझ्यावर स्थिर करीत म्हटलें. हॅटच्या सावलीमुळें त्याच्या डोळ्यांतलें पाणी अधिकच निळसर दिसत होतें.

—नाहीं, मुळींच नाहीं. तें एक कोडंच पडलं होतं मला.

—मी उकलतों तें. माझ्या डोळ्यांदेखतच त्याची जीवनज्योत विझली म्हणून तर मला सारं कांहीं कळलं. किती भयंकर ट्रॅजेडी झाली ती! पण पडद्याआड. लोकांना तिचा मागमूसही लागला नाहीं.

बागेला वळसा घालून आम्ही इगर्जीसमोर आलों. म्युनिसिपालटीच्या भव्य टॉवरवरच्या घड्याळावरून परावर्तित होणारे मावळतीकडचे सौम्य सप्तरंगी किरण पाहिले आणि इगर्जीच्या डाव्या बाजूला असलेली उतरण उतरूं लागलों. जॉर्ज सद्गदित स्वरांत त्याच्या मृत्यूबद्दलची विदारक हकीगत सांगत होता.

—मेडिकल कॉलेजांत असतांना त्याला एकदां अर्धांगाचा झटका बसला होता. परिश्रमांची पराकाष्ठा केली त्यानं अन् एकदांची त्याची प्रकृति सुधारली. हालचाल करणं जरा जड जाई त्याला. पण तो त्राससुद्धां शेवटींशेवटीं नाहींसा झाला. माझ्याबरोबरच त्यानं कोर्स संपवला. थोडक्याच दिवसांत त्याची

प्रॅक्टिस जोरांत चालल्याचं मला दिसलं. एक दिवस–सरासरी मृत्यूपूर्वी एक वर्ष असेल—तो माझ्याकडे आला. नेहमींपेक्षां जरा जास्त फिक्कट अन् अशक्त दिसत होता तो. त्याच्या सुटाच्या करड्या रंगामुळें तो फिक्कटपणा उठून दिसत होता. खोलींत बसल्याबरोबर त्यानें आंतून दार लावून घेतलें. त्याच्या कपाळावर घर्मबिंदु चमकत होते. त्याच्या अंतःकरणांत कसलं तरी भयंकर वादळ चाललं आहे याची मला थरथर कांपणाऱ्या त्याच्या हातांतल्या सोन्याच्या मुठीच्या काठीवरून सहजच कल्पना आली.

" आपल्या विवाहासंबंधीं सल्ला घेण्याला तो माझ्याकडे आला होता. आम्ही दोघेही समव्यवसायी व अगदीं बालपणापासूनचे मित्र होतों. म्हणूनच माझ्या सडेतोड सल्ल्याची तो अपेक्षा करीत होता. आपली प्रॅक्टिस, अर्धांगाचा झटका, आपल्या बालमैत्रिणीवर केलेलें निस्सीम प्रेम, दोन्ही कुटुंबांतल्या माण-सांच्या अपेक्षा–सारं कांहीं विस्तृतपणें, आडपडदा न ठेवतां त्यानं मला सांगितलं आणि भावनांच्या आवेगांत मघाशीं पाहिलेल्या त्या तरुणीचा फोटो माझ्यापुढें करीत तो म्हणाला,

"—जॉर्ज, या विवाहानं मी सुखी होईन का? विवाहाला मी कबुली देऊं ना?

" केवढा तरी वेळ मी खोलवर विचार करीत होतों. परस्परविरोधी विचार माझ्या मनापुढें आपली बाजू नीटपणें मांडून जात होते. एक वेळ वाटे कीं, मीं जर त्याला विवाह करूं नकोस असं सांगितलं तर त्याच्या भावनाप्रवण वृत्तीला धक्का बसेल. आणि दुसऱ्यांदा वाटे कीं, विवाह करण्याच्या बाजूनें मीं मत दिलें तर एका दृष्टीनें त्याच्या भावी वधूला मींच जाणूनबुजून दुःखांत लोटून दिल्याचं मला पाप लागेल. अर्धांगाच्या पहिल्या धक्क्यानं पछाडलेलं त्याचं दुबळं शरीर....

"—बोल ना रे, काय करूं मी?–केविलवाण्या स्वरानें त्यानें विचारलें.

"—मीं सांगितलं तर तूं या विवाहापासून परावृत्त होशील? विवाहाचे विचार डोक्यांतून काढून टाकशील?

" तो विवाह त्याला सुखावह होणार नाहीं हें माझें प्रामाणिक मत मीं त्याला साधार पटवून दिलें. भावनेपेक्षां बुद्धीवरच मी जास्त विसंबलों होतों. त्यालाही तें पटलं. त्यानें प्रेमळपणें माझा हात दाबला आणि पुष्पपात्रांतला एक टवटवीत गुलाब उचलीत माझा निरोप घेतला. जातांना त्याची मुद्रा शांत दिसत होती. त्यानंतर कित्येकदां आमची भेट झाली, पण आम्हीं त्या विषयावर कधींच बोललों नाहीं.

" दहाअकरा महिने लोटले होते या गोष्टीवरून. मी बहुतेक विसरलोंच होतों तें सगळं. त्या दिवशीं रविवार होता. एका नामांकित कलावंतानें उघडलेलें आपल्या चित्रांचें प्रदर्शन पहायला मी गेलों होतों. कांहीं अंतरावर एक तैल-चित्र पहात डॉ. दीयश् उभा होता. त्याच्या शेजारींच एक सुंदर तरुणी त्याच्याशीं बोलत उभी होती. मी त्याला अभिवादन करतांच तो माझ्याजवळ आला. त्याच्याबरोबरची तरुणी त्याची भावी वधू होती. तिचा माझ्याशीं परिचय करून देऊन त्याने म्हटलें,

"—कळलं ? येत्या रविवारीं आमचा विवाह !"

" त्या तरुणीनें मधुर हास्य केलें. पण मी मात्र चरकलोंच !

" दिवसांमागून दिवस गेले. मध्यंतरीं गडबडींत आमची भेट झाली नाहीं. रविवारीं वृत्तपत्रांतून मी त्याच्या विवाहाची बातमी वाचली. पण त्यामुळें मनाला आनंद वाटला नाहीं. आंतून कसली तरी टोंचणी लागल्या-प्रमाणें माझं हृदय अस्वस्थ होत होतं.

" लॅबोरेटरींत शिरतांक्षणींच परिचारिकेनें मला सांगितलें,

" आज डॉ. दीयश् आले होते. त्यांचा चेहरा सुजल्यासारखाच वाटतोय जरा. मला तरी प्रथम ओळखसुद्धां पटली नाहीं त्यांची. दोन वाजण्या-पूर्वींच निघून गेले ते. तोल सांवरणंसुद्धां कठीण जात होतं त्यांना.

" मी मनांत चरकलों. शंकाच नव्हती ! अर्धांगाचा दुसरा झटका.... त्या नवविवाहित जोडप्याचें भावी जीवन माझ्या डोळ्यांपुढें उभें राहिलें. मी त्या दिवशीं अगदीं विषण्णतेनें काम करीत होतों.

" दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं तो आंत असल्याचं मला परिचारिका सांगून गेली. मी चटकन् तिकडे गेलों आणि दारावर थाप मारली. आंतून बंद करण्यांत आलं होतं तें.

" —आलेशांद्रि— मीं हांक मारली. पण उत्तर आलं नाहीं. मीं परत जोरांत हांक मारली. तरीही गडद शांतता !

" मी आणखी एक हांक मारणार इतक्यांत एक बार झाला. त्याचा कर्णकटु आवाज, त्यामागोमाग आंत कांहींतरी धाडकन् कोसळून पडल्याचा आवाज, आणि तावदानांच्या फुटक्या कांचांची सळसळ....

" दोनतीन परिचारक धांवून आले. आंत शिरायला दरवाजा उखडून काढावा लागला. माझ्या मित्राचा देह टेबलाजवळ अस्ताव्यस्त पडला होता. रक्ताच्या थारोळ्यांत त्याचे हातपाय हालचाल करीत होते. डोक्याच्या फुटक्या कवटींतून वहाणाऱ्या रक्तांत रिव्हॉल्व्हर चकाकत होतें.

" श्वासोच्छ्वास अजूनही मंदपणें चालू होता. त्याच्या हृदयभेदक कण्हण्याकडे लक्ष न देतां सगळ्यांना आवश्यक सूचना केल्या अन् गरम पाण्यानें त्याचें शरीर धुऊन तें अलगद उचलून हॉस्पिटलाचा रस्ता धरला. अर्ध्या वाटेवरच त्याची जीवनज्योत मालवली. खोल आवाजांत, अडखळत कण्हत तो मोजकेच शब्द बोलला,

" जॉर्ज, तुझ्या सल्ल्याप्रमाणें मी वागतों तर....झालं तें झालं. मी समाधानानें मरतों आहें. मीं तिचा विश्वासघात केला असं माझ्या ह्यातींत तरी तिला कळणार नाहीं. माझ्या मृत्यूनंतर तूंही तिला कांहीं दाद लागूं देणार नाहींस अशी मला खात्री आहे."

स्तब्धपणें मी जॉर्जची हकीगत ऐकत होतों. त्याची हकीगत संपल्यावर मीं त्याला गंभीरपणें विचारलें,

—पण जॉर्ज, त्याच्या बायकोला मृत्यूचं खरं कारण कळलं का ?

—तें तिला कधींही कळणार नाहीं — खांदे उडवीत जॉर्ज म्हणाला — आणि जोंपर्यंत तें कळलं नाहीं तोंपर्यंत तिचा आलेशांद्रीविषयींचा आदर वृद्धिंगतच होत राहील.

# दीपगृह

मी ×× चें दीपगृह पाहण्यास गेलों होतों. तुटलेल्या कड्यावरच्या एका उंच खडकावर बांधलेल्या दीपगृहाचा तो पांढऱ्या रंगाचा स्तंभ अंतराळास भिडला होता. सूर्य मावळण्याच्या सुमारास, तेथला दिवा पेटविणाऱ्या माणसाच्या हातांतील कंदिलाच्या प्रकाशांत मी गृहांत शिरलों. कोंदट आणि उग्र दर्प सर्वत्र सुटला होता. कित्येक शतकांपासून घुबडांनीं तेथें आपलें वास्तव्य केलें होते. अरुंद अशा एका भयाण जिन्यानें आम्ही वर चढलों. त्यानें दिवा पेटविला तो तुटलेला कडा अतिशय खोल होता. मी खालीं वांकून हळूच नजर फेकली. लाटांची हालचाल मुळींच दिसत नव्हती. वेळेवर असलेल्या दोन होड्या दोन काळ्या ठिपक्यांसारख्या दिसत होत्या. त्या तुटलेल्या कड्याच्या उंचीची कल्पना करीत असतां माझें सर्वांग थरारून गेलें. खालीं त्यावेळीं चोहोंकडे गडद अंधःकार पडला होता. माझ्या आठवणींत अशा तऱ्हेची रात्र मी कधींच पाहिली नव्हती. रात्र कृष्णपक्षांतील असल्यामुळें अंतराळांतसुद्धां काळोख पसरला होता. पायाखालची जमीनसुद्धां दिसण्याची मारामार होती.

त्याचा निरोप घेतांना, त्यानें मला आपल्या हातांतील कंदील देऊं केला. पण माझ्याजवळ बॅटरीचा दिवा असल्यामुळें मीं तो साभार नाकारला. तेथून अर्ध्या मैलावर माझी मोटार उभी होती. तिथपर्यंत जाणारी वाट अरुंद असून त्या तुटलेल्या कड्यावरून जात होती. डाव्या बाजूला मोठमोठे खडक होते, आणि उजव्या बाजूला समुद्रावर कडा पसरला होता. मी माझ्या हातांतील बॅटरीचा दिवा पेटविला.

—रावसाहेब, तुम्ही हाच कंदील न्या—आपल्या हातांतील लोखंडी

कंदील पुढें करीत त्यानें म्हटलें.—ह्याचा तुम्हांला खात्रीनें जास्त उपयोग होईल.

—असूंदे; माझ्याजवळ आहे कीं बॅटरीचा दिवा.

—नाहींतर मीच तुमच्याबरोबर कंदील घेऊन तिथपर्यंत येतों रावसाहेब !

—नको; कांहीं जरूरी नाहीं.

—रावसाहेब, असं पहा, वाट फार धोक्याची, आणि त्यांत काळोखी रात्र.

—फार काळजीपूर्वक जाईन मी, कोटाच्या बाह्या नीट करीत मीं म्हटलें.

—परमेश्वर तुम्हांला सुखरूप नेवो.

वरेंच अंतर तोडल्यावर मी मागें वळून पाहिलें. गृहाचें दार झाकून तो आंत गेला होता. वाऱ्याची थंड झुळूक तोंडावर बसत होती. सभोंवतालचा काळोख मधूनमधून भेदरून सोडीत होता. परत फिरून जाऊन त्या माणसाला सोबतीला घ्यावें असाही विचार मनांत आला; पण मन आवरून धरलें आणि भराभर चालूं लागलों. पांचपन्नास पावलं टाकल्यावर मला चार पायऱ्या लागल्या. त्या उतरून पुढें गेल्यावर, समोर असलेल्या खडकाला वळसा घालून पुढें जावयाचें होतें; पण तेथली वाट अतिशय बिकट होती. कडा तुटलेला असल्यामुळें एका पावलाची चुकामूक झाली असती तरी जिवावर बेतलें असतें. अत्यंत काळजीनें मी दिव्याच्या कांपऱ्या प्रकाशांत एकएक पाऊल टाकीत होतों. त्या कड्याची उंची इतकी होती कीं, खालीं खडकाच्या कपारींत आदळणाऱ्या राक्षसी लाटांचा आवाज, नुसता अंधुक, अस्पष्ट ऐकूं येत होता. कांहीं कांहीं वेळां तर दिवा तोंडांत धरून तोल संभाळीत लहानलहान सुळक्यांना मिठी मारून जावं लागत होतं. हातपाय कांपत होते; कानांत सूं ऽ ऽ ऽ सूं ऽ ऽ ऽ ऽ असा आवाज होत होता. घेरी येईल अशी भीति वाटत होती; तशाही स्थितींत मी अवधान राखून संथपणें पाऊल टाकीत होतों. थंड हवा पडल्यामुळें अंगांत गरम कोट असूनसुद्धां अंग शहारून जात होतें. दांत एकमेकांवर घासून आवाज होत होता. मी मफलर गळ्याभोंवतीं आवळला आणि पुढें पाऊल टाकलें.

पण अर्धें अंतर तोडलें नाहीं तोंच दिव्याचा प्रकाश मंद पडूं लागला. बॅटरी संपल्यामुळें दुसरी भरण्याकरितां मीं खिशांत हात घातला; पण निरुपाय. मोटारींत असलेल्या दुसऱ्या कोटाच्या खिशांत ती राहिली होती. कांहीं वेळानें

दिव्याशिवाय त्या भयंकर कड्यावर मला एकटं रहावं लागेल, हा विचार माझ्या मनांत येतांच भीतीनं माझी गाळण उडाली. मी ओरडलोंसुद्धां; पण त्याचा प्रतिध्वनीही झाला नाहीं. होतां होईल तितकं अंतर तोडायचं ह्या हेतूनं मी मनाचं समाधान करून घेतलं आणि त्या अस्पष्ट मन्द प्रकाशांत भराभर पावलं टाकूं लागलों. कांहीं वेळापूर्वी खडक दिव्याच्या ज्या प्रकाशांत सोनेरी दिसत होते तो प्रकाश आतां मरणोन्मुख झाला होता.

आणि शेवटीं मला प्रकाशानं दगा दिला.

एका अवघड चिंचोळया वाटेनं खडकाच्या कपारींत घट्ट हात धरून मी जात होतों इतक्यांत दिवा विझला व माझ्याभोंवतीं गडद अंधःकार पसरला. घामानं माझं अंग डबडबून गेलं. केस ताठ उभे राहिले. थोडा वेळ मी एका सुळक्याला मिठी मारून एखाद्या दगडाप्रमाणं उभा राहिलों. कांहीं वेळानं श्वास कोंडून धरला आणि धैर्य धरून घसरत घसरत एकदांचा त्या संकटांतून पार पडलों. पुढं पाऊल टाकण्यास मात्र माझं मन धजत नव्हतं. कोणीतरी शेकडों अदृश्य हातांनीं मला कड्यावरून खालीं ढकलून देत असल्याचा भास होत होता; पण तिथंच राहून कांहीं भागायचं नव्हतं, म्हणून निरुपायानं मीं मनाची तयारी केली आणि जमिनीवर पडून सरपटत चांचपडत मी थोडथोडं अंतर तोडूं लागलों. दगडाचीं अणकुचीदार टोंकें सर्वांगाला लागून त्यांतून रक्त वहात होतं. आतां यांतून वांचणं कठीण असं मला वाटूं लागलं, आणि दीपगृह पहावयास आल्याबद्दल व त्या दीपगृहांतील माणसाची सूचना अमान्य केल्याबद्दल मला पश्चात्ताप होऊं लागला. घरच्या माणसांची आठवण होऊन मी रडूं लागलों; उजाडेपर्यंत तिथंच कसं तरी रहायचं. तोंपर्यंत जीवजंतूंच्या ताब्यांतून वांचलों तर ठीक. नपेक्षां परमेश्वरी इच्छा.

कमींत कमी एक तास मी तशा स्थितींत पडून राहिलों असेन. इतक्यांत माझ्या डोक्यावरच मोठमोठ्यानं पंखांची फडफड होऊं लागली. तीं गिधाडें होतीं. माझ्या जखमांतून वाहणाऱ्या रक्ताचा त्यांना सुगावा लागला असावा. त्यांतल्या एका गिधाडाच्या अजस्र पंखाचा फटकारा माझ्या डोक्यावर बसला. या पक्ष्यांच्या भक्ष्यस्थानीं पडण्यापेक्षां काय होईल तें होवो म्हणून मी खडकावर सांवरून उभा राहिलों आणि वेड्याप्रमाणं मागंपुढं न पाहतां पळत सुटलों.

जोरानें घोंघावणाऱ्या वादळाची व पावसाची मला बिलकूल पर्वा नव्हती. पळतांना झाडांच्या पाळांमुळांना घांसून माझे पाय खरचटत होते; पण मला त्याची फिकीर नव्हती. मी बेफामपणें पळत सुटलों होतों याची मला कल्पना नव्हती.

आणि हाय—!

माझ्या पायाखालचा एक दगड घसरला, माझा तोल सुटला व मी खालीं पडलों.

एक, दोन, तीन सेकंदपर्यंत माझें शरीर वातावरण कापीत खालीं जात होतें; पण मध्येंच अर्धवट बेशुद्धींतच मी अधांतरीं लोंबकळूं लागलों. कोणीतरी मला झेलून धरलं होतं. वादळी वारा वहात होता. लाटांचा आवाज स्पष्ट ऐकूं येत होता. पूर्णपणें शुद्धीवर आल्यानंतर मला आपल्यावरील विकट प्रसंगाची कल्पना झाली.

त्या तुटलेल्या कड्याच्या अर्ध्या उंचीवर एक लहानसं झाड वाढलं होतं, त्यावर माझं शरीर पडलं होतं. माझ्या कोटाचा एक भाग कातडीसहित एका फांदींत अडकल्यामुळे मी अंतराळीं लोंबकळत होतों. त्याच अपुऱ्या आधारावर माझं जीवित अवलंबून होतं.

माझी किंचित् हालचाल झाली असती व वाऱ्याचा वेग जरा वाढला असता, तर माझें शरीर समुद्रकांठच्या खडकांवर आपटून त्याच्या चिंधड्या उडाल्या असत्या. ती विकट परिस्थिति फारच यातनामय होती. हाय हाय, नुसता श्वासोच्छ्वाससुद्धां करतां येत नव्हता; इतक्यांत—

कोट हळूहळू फाटूं लागला; कातडी सुटूं लागली, माझा जीवनाधार....

मी केवढ्यानं तरी किंकाळी फोडली.

* * *

इतक्यांत मी जागा झालों. सूर्याचे कोवळे किरण खोलींत गर्दी करीत होते. इतकं भयंकर स्वप्न मला केव्हांच पडलं नव्हतं.

# फसवणूक

—श्री, जरा फिरून येऊं का रे आपण?

—आत्तां? आश्चर्य आहे! किती वाजायला आले याची कल्पना तरी आहे का तुला?

—नुकताच एक वाजला आहे. पण तरीसुद्धां तुझी हरकत नसेल तर जरा भटकून येऊं. झोंपच येत नाहीं मुळीं. जरा बरं तरी वाटेल फिरण्यानं. दिवा लावीत अविनाश म्हणाला.

या अशा अवेळीं फिरावयाला जाण्याची अविनाशची इच्छा पाहून मला क्षणभर नवलच वाटलें. अंथरुणाला पाठ लागली कीं कुठल्यातरी सुखस्वप्नांत गुंगून जाणारा अविनाश केव्हांच एक वाजून गेला तरी अजून जागा रहावा अन् इतकंच नव्हे तर त्यावेळीं फिरावयाला जाण्याची त्यानं इच्छा प्रदर्शित करावी ही आश्चर्य वाटण्याजोगीच गोष्ट होती. किंचित् उत्सुकतेनं मीं कांहीं वेळ त्याच्या चेहऱ्यावर नजर स्थिर केली अन् म्हटलं—

—जशी तुझी इच्छा!

अविनाश म्हणजे माझा एक आनंदी बालमित्र. त्याची ती फुलपांखरा-सारखी वृत्ति, मनमोकळा स्वभाव, खेळकरपणा वगैरे गोष्टी सर्वांच्या परिचयाच्या झाल्या होत्या. पण आज पहावं तर एकेक विचित्रच दिसत होतं. आज दुपार-च्या गाडीनं अविनाश आल्यापासून मी पहात होतों. त्याच्यांत केवढातरी बदल झाला होता. नेहमींची हंसरी मुद्रा उदास विचारांच्या छायेनं काळवंडली होती. संधि मिळाली कीं सुंदर सुंदर कोट्या करायला तो कसा टपलेला असे! दुसऱ्याची थट्टा करतांना त्याच्या चेहऱ्यावर डोकावणारा मिस्कीलपणा किती मजेदार दिसे! पण आज आल्यापासून चार मनमोकळे शब्द तो बोलला असेल तर शपथ! जणू

त्याच्या मनाचं फुलपांखरूं कसल्यातरी दडपणाखालीं गुदमरत होतं.

आणि अविनाशशीं माझा दाट परिचय असल्यामुळें त्याची ती मनःस्थिति पाहून मला कसंसंच वाटलं. एकदोनदां तर मीं अगदीं ठरवून टाकलं कीं आपण अविनाशला सरळ विचारायचं,

"काय रे झालंय तुला आज? मघांपासून पहातों...." पण मनांत विचार आला, "कदाचित् प्रवासाच्या शिणामुळं तर असं झालं नसेल ना?"

पग फिरायला जायची त्याची इच्छा पाहून मात्र मी मनांत पूर्णपणें समजून चुकलों कीं, अविनाशची वृत्ति ठिकाणावर नाहीं. कांहीं तरी महत्वाची गोष्ट घडली आहे खास!

५-१० मिनिटांच्या आंतच आम्ही बाहेर पडलों. नुकतेच थंडीचे दिवस सुरू झाले होते. चोहोंकडे शांत वातावरण पसरलेलं. नदीचं विस्तीर्ण पात्र समोर दिसत होतं. कांठावरच्या माडांच्या सावल्या आणि मधुर चांदणं त्या पात्रावर पसरलं होतं. पलीकडच्या कांठाला लागलेल्या दोनतीन होड्यांवरचे दिवे चकाकत होते.

मी मुद्दामच स्तब्ध राहिलों होतों. अविनाश तर तोंडावाटे एक शब्दही काढीत नव्हता. बरंच अंतर चालून गेल्यावर अविनाशनं माझ्याकडे वळून म्हटलं,

—श्री, माझ्या वागणुकीचं तुला मोठं कोडं पडलं असेल, नाहीं?

—असं एकाएकीं कां वाटावं तुला? मीं निर्विकारपणाचा आव आणीत म्हटलं.

—जरा सरळ बोलशील का रे? खरं सांगायचं म्हणजे आज तुझा अविनाश थट्टा ऐकून घेण्याच्या मन:स्थितींत नाहीं. तुला नवल वाटेल कदाचित्! पण गेल्या २४ तासांत मी इतका कांहीं बदलून गेलों आहें, कीं कल्पनाच करवत नाहीं. माझं मलासुद्धां राहून राहून आश्चर्य वाटतं. मी हंसण्याचा बोलण्याचा प्रयत्न करतों. पण कांहीं जुळत नाहीं.

—पण झालं तरी काय रे असं? मीं उत्कंठेनं त्याच्याकडे पहात म्हटलं. त्याच्यांत घडलेला विलक्षण बदल पाहून त्याची थोडी गंमत करावी अशी माझी

इच्छा होती. पण त्याची ती हताश केविलवाणी मुद्रा पाहून मी त्या भानगडींत पडलोंच नाहीं. माझा हात आवेगानं दाबीत अविनाश म्हणाला,

—श्री, मीं लग्न करून घेतलं तर काय वाटेल रे तुला ?

—अस्सं ! — मी मिस्कीलपणें डोळे मिचकावीत म्हटलं.

—माझ्या प्रश्नाचं हें कांहीं उत्तर नाहीं— किंचित् नाराज होऊन अविनाश म्हणाला. त्याला क्षणभर चिडविण्याच्या हेतूनं मी उद्गारलों,

—मला ना ? फार फार आनंद होईल ! इतकंच नव्हे तर शक्य तितक्या लवकर तूं जर आम्हांला लाडू खायला घातलेस तर मी तुझे खूपच आभार मानीन. तुझा खेळ होतो पण गरीब मुलींना त्रास होतो तो तरी वांचेल.

त्या तशा मनःस्थितींतही तो क्षणभर हंसला. सुंदर अन् हुषार मुलींना सहजासहजीं आकर्षित करण्याच्या आपल्या कौशल्याची अप्रत्यक्षपणें होत असलेली स्तुति ऐकून त्याला अभिमानही पण वाटला थोडा. पण हळूहळू त्याच्या चेहऱ्यावर गांभीर्याची गडद छाया पसरली. नदीच्या कांठावरून जातां जातां तो म्हणाला,

"—श्री, कालपर्यंत मी किती आनंदांत होतों. कोणतीच जबाबदारी माझ्या शिरावर नव्हती. पण काल संध्याकाळीं बाबांनीं माझ्यापुढं एक फोटो टाकला आणि किंचित् आग्रही स्वरांत म्हटलं, "या पोरीशीं तरी तुला लग्न करायचं आहे कीं काय तें पहा ..." आणि ते बाहेर निघून गेले. अजून लग्नाचा विचार करायची आपली इच्छा नाहीं अन् फोटोही पण आपल्याला मुळींच पहायचा नाहीं असं निक्षून सांगण्याच्या तयारींत मी होतों. पण इतक्यांत फोटोकडे लक्ष गेलं अन् मी स्तंभितच झालों. तें असामान्य सौंदर्य मला अपरिचित खास नव्हतं. इतकंच नव्हे तर मीं तुलासुद्धां तिच्यासंबंधीं मागं एकदां म्हटलं होतं,

"—पोरगी असावी तर अशी. लग्न करावं तर अशा मुलीशीं."

" अन् अगदीं त्याच मुलीशीं विवाह करण्याची संधि मला मिळत होती. आनंदानं माझं मन अगदीं भारून गेलं. कांहीं वेळ अगदीं कांहींच सुचेनासं झालं मला. बऱ्याच वेळानं मी भानावर आलों. मनांत विचार आला,

"—या मुलीशीं लग्न केलं तर सुखी होईन का मी ?...."

" अन् अगदीं त्याच क्षणीं माझ्या मनःस्थितींत विलक्षण बदल झाला. लग्नाचा विचार इतका बेचैन करून सोडील असं मला स्वप्नांतसुद्धां कधीं वाटलं नव्हतं. पूर्वी लग्न म्हटलं म्हणजे किती थट्टा करीत असें मी.... पण आज... "

अविनाश आणखीही कितीतरी बोलला असता. पण मी मध्येच प्रश्न केला.

—पण अविनाश, यांत माझा संबंध कुठं येतो हे नाहीं मला अजून कळलं !

—खरंच ! कुठल्या कुठं वाहवलों मी....पण आतां सरळच विचारतों. त्या मुलीशीं लग्न करावं कीं नाहीं, याबद्दल मला तुझा सल्ला पाहिजे. तुझा सल्ला प्रामाणिकपणाचा आणि माझ्या हिताचा असेल याबद्दल मला मुळींसुद्धां शंका वाटत नाहीं. तुझ्या अन् माझ्या वयांत मोठंसं अंतर नसेल. पण आम्हां उभयतांच्या दृष्टिकोनांत केवढा तरी फरक आहे. तुझ्या नीतिविषयक कल्पना, चिकित्सक दृष्टि.... माझ्यासारखा एखादा बाह्य देखाव्याला भुलेल. पण तूं....

—इतकं कांहीं हरभऱ्याच्या झाडावर चढवायला नको...पण तें सारं राहूं दे बाजूला. ती मुलगी कोण हें तर आधीं सांगशील ? प्रश्नार्थक मुद्रेनं त्याच्याकडे पहात मीं म्हटलं. अविनाशचे काळेभोर डोळे उल्हसितपणें चमकले. कोणत्यातरी मधुर संवेदनेनं त्याचं सर्वांग रोमांचित झालं. त्या गोड संभ्रमामुळें त्याच्या आवाजांत थोडासा कंपही भरला. एकेक अडथळा मागें सारीत निघालेल्या प्रवाहाप्रमाणें त्याच्या तोंडांतून उद्गार बाहेर पडले.

—नीला ! तुझ्या शेजारची नीला !....

त्या शब्दांमागं माझं उत्तर ऐकून घेण्याची केवढीतरी उत्सुकता दडून राहिली होती. मी मात्र अविनाशचे ते अनपेक्षित शब्द ऐकून दचकलों. केवढातरी धक्का बसला मला. क्षणार्धांत कितीतरी कल्पना आणि कितीतरी दृश्यें डोळ्यांपुढं खेळून गेलीं. मी आश्चर्यानं उद्गारलों,

—कोण नीला ? आमच्या समोरच्या घरांतली नीला ?

—हो. ती निळ्या तेजस्वी डोळ्यांची पोरगी. आतां सांग ना मी काय करूं तें. श्री, त्या पोरीविषयीं केवळ तूं एकटाच काय तो मला हवं तें सांगूं शकशील.

—काय म्हटलंस ?....

पण नंतर बराच वेळ तो काय उत्तर करतो याच्याकडे माझं लक्षच नव्हतं. मीं विचार करीत होतों. पण त्याच्या प्रश्नाचं उत्तर देणं मात्र मला क्षणोक्षणीं जास्त जास्तच कठीण वाटत होतं. आपण जणू एका चक्रव्यूहांत शिरलों आहोंत, अगदीं मध्यभागीं जाऊन पोंचलों आहोंत, पण तिथून बाहेर पडायची योग्य वाट सांपडत नाहीं असंच क्षणभर वाटलं मला.

अविनाशला सल्ला द्यायचा प्रसंग माझ्यावर आला नसता तर किती छान झालं असतं! केवढी मोठी जबाबदारी येऊन पडली होती माझ्यावर! नीला, ती सुंदर पोरगी! मी अगदीं पुरी ओळखत होतों तिला. तिची प्रत्येक हालचाल, तिचा प्रत्येक गुणदोष, तिची मनोवृत्ति, अन् तिचे बारीकसारीक विचारसुद्धां माझ्या परिचयाचे होते...अन् त्याच मुलीविषयींचं माझं प्रामाणिक मत माझ्या जीवश्चकंठश्च मित्राला हवं होतं.

नीला, अविनाश, नीलेची आई....कितीतरी मूर्ति माझ्या डोळ्यांपुढून सरकत जणू मला बजावीत होत्या,

—तुझं अगदीं प्रामाणिक मत दे बरं का!....

विचार करावयालासुद्धां वेळ नव्हता. चक्रव्यूहांतून सुटावयाला कोण धडपड चालवली होती मीं! कुठल्या वाटेनं जावं याबद्दल निश्चय होत नव्हता. अगदीं गोंधळून, बावरून गेलों होतों मी. इतक्यांत एका विलक्षण कल्पनेनं मी अगदीं थरारून गेलों. त्या आकस्मिक विचारामुळें मी अगदीं भांबावून गेलों. पण कांहीं वेळानं, चक्रव्यूहांतून सुटण्याकरितां धडपड करून निराश झालेल्या वीरानं एकाएकीं धीर करून पुढं पाऊल टाकावं त्याप्रमाणें आपणही करीत आहोंत असं मला वाटलं. अविनाशचा हात माझ्या हातांत घेत मीं म्हटलें,

—अविनाश, किती सुखी अन् नशीबवान् तूं!

—म्हणजे? अविनाशनं उत्सुकतेनं विचारलं.

—तुझं अभिनंदन करतो मी. नीलासारखी पोरगी मिळायला नशीब पाहिजे! कळलं?....

पण पुढं मात्र मी बोलूं शकलों नाहीं. जणू कोणी तरी माझ्या तोंडावर हात ठेवून मला पुढं बोलायची बंदी करीत होतं. नीलेसंबंधीं किती तरी

बोलावंसं मला वाटत होतं. मीं एकसारखं तिच्यासंबंधीं बोलत रहावं अशी इच्छा अविनाशचे आसावलेले डोळे दर्शवीत होते. पण माझ्या तोंडून मात्र एक शब्दही निघत नव्हता. डोक्यांत विचारांची गर्दी झाली होती. कांहीं वेळानंतर मी स्वतःशींच पुटपुटलों,

—मी चुकलों तर नाहीं? अविनाशनं माझं प्रामाणिक मत विचारलं अन् मी....?

—श्री, बोलत कां नाहींस? नीलेला मी आवडेन का रे?— ते मोजकेच शब्द माझ्या हृदयावर जबरदस्त आघात करून गेले. अविनाशचा स्वभाव किती साधाभोळा. त्याला आम्हीं फुलपांखरूं म्हणत होतों तें कांहीं उगीच नव्हे! अगदीं सरळ रस्ते काय ते त्याला माहीत.

अंथरुणाला पाठ लागतांच अविनाशचा डोळा लागला. माझी झोंप मात्र पार उडाली होती. जीव बेचैन होऊन गेला होता, नीट विचार करण्याइतकंही मनःस्वास्थ्य नव्हतं मला. अविनाशचा मंद श्वासोच्छ्वास त्या खोलींतल्या शांत वातावरणांत मिसळत होता. मी मात्र या कुशीवरून त्या कुशीवर वळत तळमळत होतों.

नीला सुंदर होती, सुस्वभावी होती अन् हुषारही पण होती. अविनाशला मीं मघां म्हटल्याप्रमाणें तशा प्रकारची मुलगी मिळायला नशीबच हवं! पण तिच्या हातून घडलेली ती चूक....कुलीन घराण्यांतल्या मुलीनं जरी प्रीतीच्या खेळांत भाग घेतला तरी ज्या थरापर्यंत जाऊं नये तिथपर्यंत ती जाऊन पोंचली होती. अन् वसंतनं तिला पूर्णपणें फसविली हें सारा गांव जाणून होता. वसंतनं नीलेला लग्नाचं वचन दिलं होतं हें मला पूर्ण माहीत होतं. पण सारींच वचनं जर पाळलीं गेलीं असतीं तर जगांत दुःख कसं दिसलं असतं?

नीलेच्या विधवा आईनं प्रयत्नांची पराकाष्ठा केली, पैशाकडे बिलकूल लक्ष दिलं नाहीं. पण अशक्य! कुठं म्हटल्या कुठंच स्थळ मिळेना. नीलेच्या हुषारी-बद्दल माहिती विचारली कीं सोयरीक मोडायची हें अगदीं ठरलेलं; अन् तसाही प्रसंग न आला तर गांवांतले कुटाळ निनांवी पत्रं लिहिण्यांत आपण किती हुषार आहोंत हें दाखवायची संधि कधीं दवडीत नसत. मला मात्र फार वाईट वाटे या गोष्टीचं. ‘चढणाऱ्या वेलीला शक्य तर टेकू देऊन तिला जोमानं चढायला मदत

करावी. असलेला टेकू काढून घेऊन तिची वाढ खुंटवूं नये' असं माझे वडील नेहमीं म्हणत. मलाही अगदीं तसंच वाटे.

पण नीलेच्या आईचा समज मात्र अगदीं निराळा झाला होता. निनांवी पत्रांचा कारखानदार अन् बातमीदार मीच अशी तिची खात्रीच झाली होती. सुरुवातीला अप्रत्यक्षपणें माझ्यावर शिव्यांचा मारा चालू झाला अन् पुढंपुढं प्रत्यक्ष-पणं ती माझ्यासंबंधीं अपशब्द वापरूं लागली. विनाकारण होत असलेला हा गहजब असह्य होऊन मीं एक दिवस नीलेच्या आईला म्हटलं,

—माई, तुमचा अगदीं गैरसमज होत आहे. मला सारा प्रकार माहीत आहे. पण कधीं म्हटल्या कधींच मी शब्दावाटे त्याचा उच्चार केला नाहीं. माझ्या हातीं कांहीं असतं, किंवा तुम्हीं माझ्या सहाय्याची अपेक्षा केली असती तर याचं प्रत्यंतर मिळालं असतं तुम्हांला....अन् ते तुम्हांला बरं वाटावं म्हणून नव्हे, तर मला स्वतःला या बाबतींत कांहींतरी करावंसं मनःपूर्वक वाटतं म्हणून.

—कळतात बरं का मला हीं मानभावीपणाचीं बोलणीं. शेजाऱ्यांनीं दावा साधायचा नाहीं तर कुणीं साधायचा?—तिरस्कारानें माई उत्तरल्या.

माईचं समाधान करण्याचा नाद मीं सोडून दिला. नीलाही माझ्यावर रुष्टच झाली होती. मला मात्र नेहमीं वाटत होतं, नीला एकदां चुकली, पण भावी आयुष्य प्रामाणिकपणें कशावरून घालविणार नाहीं ती? आपली चूक सुधा-रायची संधि कां मिळूं नये तिला?

अन् आज ती संधि देणं किंवा न देणं माझ्या एका शब्दावर अवलंबून होतं. माझ्या आचारांत अन् विचारांत सुसंगति आहे हे माझ्या मनाला पटवून द्यायचा तोच क्षण होता.

पण त्या प्रश्नावर जों जों विचार करावा तों तों मी जास्तच बुचकळ्यांत पडत होतों. जाणूनबुजून आपण दुसऱ्याची फसवणूक करून जगाच्या दृष्टीनं अनिष्ट असलेली गोष्ट करायला त्याला भाग पाडायचं–नीलेशीं लग्न करण्याचा सल्ला अविनाशला द्यायचा....माझीं स्वतःचीं मतं कशींही असलीं तरी अविनाशचा दृष्टिकोन लक्षांत घेणं जरूर नव्हतं का? कित्येक मुलींना अविनाशनं आपल्या नादीं लावल्याचं मला माहीत होतं. एकदोघांना विवाहाचीं वचनेंही तो देऊन

चुकला होता. पण नीलेच्या हातून पाप घडलं याची त्याला ओझरतीसुद्धां माहिती मिळाली असती तर तो तिच्याशीं लग्न करायला तयार झाला असता का ?

अविनाश अन् नीला दोघेंही एकाच माळेचे मणी. पण अविनाशला सल्ला द्यायच्या बाबतींत माझी मनःस्थिति कशी द्विधा झाली होती !

उठून खोलींत येरझारा घालूं लागलों. घड्याळाचे ठोके त्या शांततेंत विरत होते. दिव्यांतलं तेल संपत आल्यामुळं ज्योत मंदपणें तेवत होती. शेवटीं मीं मनाशींच निश्चय केला, उद्यां उठल्याबरोबर अविनाशला सारं कांहीं स्पष्ट सांगायचं. फसवणूक नाहीं करायची.

अंथरुणावर येऊन पडलों. सहजच अविनाशच्या चेहऱ्यावर नजर फिरकली. किती मोहक स्मित ओसंडत होतं त्याच्या चेहऱ्यावर ! कसल्या उन्मादक मधुर स्वप्नांत स्वारी गुंगली होती कुणाला ठाऊक ! माझ्या अंतश्चक्षूंपुढं एक दृश्य येऊन गेलं. त्या दृश्यांत जणू अविनाशला पडलेलं स्वप्नच अवतरलं होतं.

"नदीच्या प्रशांत प्रवाहावर मंद मंद वायुलहरी भिरभिर फिरताहेत. अगदीं मध्यभागीं एक सुंदर होडी आकाशांतून ओसंडणारं चांदणं आपल्या शुभ्र शिडांत भरून घेत आहे. आंत बसलेल्या युवकाच्या हातांतलं वल्हं निश्चल आहे. त्याच्या शेजारीं एक सुंदर बालिका बसली आहे. एकमेकांना आपल्या डोळ्यांत भरून घेण्यांत ती दोघेंही साऱ्या जगाला विसरलीं आहेत. त्या निःस्तब्धतेचा भंग करीत युवकानं त्या बालिकेला म्हटलं,

—"नीला, लग्न करायचं नाहीं असं मीं मनाशीं ठरवलं होतं, 'पण.... तुझ्यासारख्या देवता या जगांत आहेत याची त्यावेळीं मला कल्पना नव्हती...."

"अविनाश, किती सुखी होऊं आपण..."

मीं स्वतःशींच हंसलों. अन् केव्हां माझा डोळा लागला तें मला कळलंच नाहीं. जागा होऊन पहातों तों चांगले आठ वाजलेले. आरशांतलं प्रतिबिंब पहात अविनाश कुठलं तरी सुंदर पद गुणगुणत होता. माझी चाहूल लागतांच मागे वळत तो बालिशपणें म्हणाला,

—आत्तांच मीं एका माणसाला पाहिलं. किती सुंदर ! सांग पाहूं कोण तें ?

—मीं कांहीं कवि नाहीं अविनाश. ज्योतिषी तर खास नाहीं!

अविनाश अगदीं उल्हसित झाला होता. पण त्याचा उल्हास पाहून मला मात्र भारी वाईट वाटलें. अविनाशच्या आनंदाला मीच कारणीभूत झालों होतों. अन् आतां सारी वस्तुस्थिति त्याच्या कानांवर घालायचा मीं मनाशीं निश्चय केला होता.

पण धीर झाला नाहीं अन् त्यासंबंधीं मी त्याला कांहींच सांगू शकलों नाहीं.

नीलेविषयीं आम्ही कितीतरी बोलत बसलों. निरोप देतांना मीं अविनाश-चे हात माझ्या हातांत घेतले अन् अत्यंत हळुवार आवाजांत म्हटलं,

—अविनाश! नीला हुषार आहे. अगदीं पुढारलेली, मोकळ्या वागणु-कीची. जुनाट, बुरसलेल्या विचारांच्या या गांवांत हे गुण, दोष या सदरांत जातात. कुटाळांना निरनिराळ्या कंड्या पिकविण्याला हा एक विषय मिळतो. अन् प्रसंगीं त्यांत घराण्याचं वैर असलं कीं, मग सोयच नाहीं!....

धडधडीत किती खोटं बोलत होतों मीं. अन् तेंही एक जिवलग मित्राशीं! माझ्या या शब्दांवर विश्वासून तो आपली जन्माची सोबतीण निवडणार होता! आपल्या भावी आयुष्याची उभारणी तो केवळ माझ्या शब्दावर विसंबून करणार होता! ...

अविनाशचं लग्न झालं. मोठा थाटामाटाचा समारंभ झाला. माईच्या डोळ्यांचं पारणं फिटलं. अशक्य गोष्ट शक्य झाली होती. विहिणीचा निरोप घेतांना अविनाशची आई माईला म्हणत होती,

—आज पांच वर्षं आम्हीं अविनाशच्यामागं लग्नाचं टुमणं लावीत होतों. पण कधीं दाद दिली नाहीं त्यानं! अन् यावेळींसुद्धां त्याच्या एका बालमित्रानं जर त्याला आग्रह केला नसता, नीलेसंबंधीं चांगलं मत दिलं नसतं तर मागच्या-सारखंच झालं असतं.

—खरं?....पण तो मित्र तरी कोण? —किंचित् कांपऱ्या आवाजांत माईनीं विचारलं.

—तुमच्या शेजारचा श्रीकांत.

—कोण म्हटलंत ? श्री....

त्या एका उद्गारांत कितीतरी भावना संमिश्र झाल्या होत्या. मी तिथून हळूच सटकलों.

अजूनही माझी मनोवृत्ति ठिकाणावर आलेली नाहीं. आपण केलं तें योग्य केलं कीं अयोग्य याबद्दल मी अजून कांहींच निश्चित ठरवूं शकलों नाहीं. मनाची टोंचणी कित्येकदां असह्य होते अन् मी अगदीं बेचैन होऊन जातों; तर कित्येकदां समाधानाचा अन् शांतीचा उच्च, उदात्त आनंद उपभोगतांना वृत्ति उल्हसित होऊन जाते.

